

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ११ वें ] मार्च १९५८ [ अंक ६



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका









LONG-LASTING
ELEGANT
ECONOMICAL
RELIABLE
A MHATRE PRODUCT
PLATO
SHILFI.M.P.361




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष अकरावें
अंक सहावा

# नवभारत

मार्च
१९५८

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
‘गणेश भुवन’ २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘नवभारत’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( ज. सातारा )

‘नवभारत’ मासिक, मार्च १९५८

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.– का. सं. ]

**श्री. शं. बा. जोशी :** “मऱ्हाटी संस्कृति” या ग्रंथाचे लेखक, विविध नियतकालिकांतून संशोधनपर लेखन.

**प्रा. व. मं. सिरसीकर :** पुणें येथील स. प. कॉलेजांतील राज्यशास्त्राचे प्राध्यापक; “राज्यशास्त्राचा विकास” इत्यादि ग्रंथांचे लेखक.

**डॉ. प्र. न. जोशी :** पुणें येथील नूतन मराठी विद्यालय हायस्कूलचे उपप्रमुख; “महाराष्ट्रांतील मधुरा-भक्ति” इत्यादि [illegible]

---

## साभार पोंच–

१. **उब आणि गारठा–** शशिकांत पुनर्वसु, मौज प्रकाशन-गृह, मुंबई ४, किंमत ४ रु.

२. **बापाची पेंड–** द. मा. मिरासदार, मौज प्रकाशन-गृह, मुंबई ४, किंमत ३·७५ रु.

३. **यशोदा आणि इतर कथा–** श्री. ना. पेंडसे, मौज प्रकाशन-गृह, मुंबई ४, किंमत ४·५० रु.

४. **मृगजळ–** इंदिरा संत, मौज प्रकाशन-गृह, मुंबई ४, किं. २·५० रु.

५. **यांत्रिक–** शरच्चंद्र मुक्तिबोध, मौज प्रकाशन-गृह, मुंबई ४, किं. ३·५० रु.

६. **शिळान–** उद्धव ज. शेळके, शाम प्रकाशन, अमरावती, किं. १·७५ रु.

ले. श्री. रोजे मार्‌तँ द्‌यु गार्द : अनु. प्रा. व. म. परांजपे

# आंद्रे जीद : २ :

## जिद व मादाम जिद हीं दोन टोकें

जान्युआरी १९२३

'क्युवेरविल' ला ( Cuverville ) माझी ही पहिलीच खेप. हा कांहीं सीझन नाहीं इथें यावयाचा. पण जिदनें मला पॅरिसहून ओढूनच आणलें.

सबंध प्रवासांत मात्र मला कांहीं चैन नव्हतें !

आम्ही 'सां लाझार' ( Saint-Lazare ) ला उतरलो आणि सुरुवातच झाली. जिद हा प्रवास नेहमीच करतो. पण तरीहि तो अडाण्यासारखा स्टेशनवर भटकत होता इकडून तिकडे. तिकिट कुठें काढायचें, प्लॅटफॉर्मवर कसें जायचें, किंवा 'ल आव्र' ( Le Havre ) ला जाणारी गाडी केव्हां सुटते, फार काय, याच गाडीला जोडून 'क्रिक्‌तो' ( Cricquetot ) ची गाडी मिळेल कां नाहीं, – याची कसलीच कल्पना त्याला नव्हती. कोणाला विचारावें, तर तें मनाला पटत नव्हतें. "या इकडे बघूं बरं, ... पुढें तर चल ...... माझ्यामागून ये तूं म्हणजे बस्स, ......" असें म्हणत, उगीच इकडून तिकडे तो धांवत होता. अगदीं शेंवटल्या क्षणीं आम्ही धांवत एका गाडींत चढलो. गर्दी साधारण होती. बहुधा ही गाडी बरोबर असावी, अशी मी आशा करीत होतो.

आणि मग, फक्त जिदलाच शक्य होईल अशा महाविचित्र पद्धतीनें त्याचें वागणें सुरूं झालें. खांद्यावर टाकलेला ओव्हरकोट अंगाभोंवतीं लपेटून घेतला. डोक्यावर पार मागल्या बाजूला एक फरची काळी हॅट टांगल्यासारखी ठेवली होती. मासिकें आणि पुस्तकें यांनी दोन्ही हात भरून गेले होते. डोळयांत विचित्र चौकस भाव होता, आणि त्याच्या जोडीला तें मनोवेधक हास्य, –सहजपणाची मोकळी वागणूक असली कीं विशेष कोणी आपल्याकडे बघत नाहीं या भ्रमांतून निर्माण केला गेलेला त्यांचा तो कृत्रिम अकृत्रिमपणा– असा तो सबंध गाडीभर हिंडत होता. आणि त्या कमालीच्या थंडगार पडलेल्या निर्मनुष्य कॉरिडॉरमधून माझी आपल्यामागें वरात काढित होता. एंजिनशेजारच्या डब्यापासून ते गार्डाच्या डब्यापर्यंत असे आम्ही अनेकदां तें अंतर पायाखालीं घातलें. एकामागून एक प्रत्येक डब्यांत तो डोकावून पहात होता. जिथें गर्दी कमी होती, तिथें क्षणभर थांबे,– पण लगेंच पुढें चालूं. ह्या डब्याकडे पाठ कां वळविली, किंवा तो पलीकडला डबा त्याच्या मनास कां आला नाहीं, याचें कसलेंच कारण मला समजलें नाहीं. मध्येंच एखादे वेळीं मघाशीं नाकारलेल्या गाडीच्या दुसऱ्या टोंकाला असलेल्या डब्याची आठवण होऊन तो सोडल्याबद्दल त्याला वाईट वाटे, आणि तो शोधण्याकरितां माझी रवानगी व्हावयाची. तो कांहीं सांपडावयाचा नाहीं आणि मग पुनः भ्रमंति सुरूं ! शेवटीं त्याच्या या उद्योगांत मी त्याला सोडून दिलें, आणि कोपऱ्यांतली एक जागा शोधून तेथें बसलों. पण माझ्याच्यानें पुस्तकदेखिल वाचवेना. मला इतकें बेचैन करणारें काय होतें तें सांगणें कठीण आहे. जबाबदारी आणि अनिश्चितता अशी दुहेरी जाणीव होती माझ्या मनांत. सर्वांनाच हें कळूं शकेल असें मला वाटत नाहीं. कोणत्याहि क्षणीं कसला विक्षिप्तपणा करील तें सांगतां येत नाहीं असें एखादें मूल, अगर खूप ताप चढल्यानें वातांत








बरळणारा रुग्णाईत, असें कोणीतरी संभाळून नेतांना जी काळजी वाटेल, तशी मला वाटत होती.

क्युवेरविलच्या माझ्या मुक्कामांत असे कांहीं प्रसंग आले कीं, जेव्हां मदाम जिदच्या वागण्यांत कसल्यातरी खिन्नतेची छटा आढळल्यासारखी मला वाटली. आणि त्यावेळीं मग मला आमच्या या प्रवासाची आठवण झाली. बोलतां बोलतां ती एकदम गप्प होई, मध्येंच गडबडून जाई, आणि लगेच हा मनाचा गोंधळ लपविण्याचा अयशस्वी प्रयत्न करी, कधींकधीं काळजीची, — भीतीची म्हणानांत सूक्ष्म छटा चमकून जाई, — क्षणभरच ती टिके हें खरें ! अशा कांहीं वेळां आल्या, कीं जेव्हां जिद हजर असतांना—विशेषतः तो अगदीं रंगांत यायचा, खुषींत, मोकळा, बोलण्याच्या भरांत भान विसरलेला असावयाचा—त्यावेळीं मदाम जिद, जणूं धगधगत्या निखाऱ्यावरून चालावें लागत आहे, असा चेहरा करी !

अशावेळीं तिच्या मनांत कसला कल्लोळ चालू असेल ? कोणते विचार, कसल्या स्मृति, शंका तिच्या मनांत चमकून जात असतील ? मला खात्री आहे तिची ही क्षणभर टिकणारी पण कमालीची अस्वस्थपणाची भावना, माझ्याचसारखी आहे. मला प्रवासांत आलेला अनिश्चिततेचा अनुभव तिनें फार काळ घेतला आहे. केव्हां केव्हां त्यांतूनच मनाला जाळणारी चिंता निर्माण होत असली पाहिजे. तिच्यासारख्या कोमल, पापभीरू, परंतु रूढिप्रिय, संयमी वृत्तीच्या स्त्रीला, या असल्या लहरी, मोहावश, चंचल नवऱ्याचा काय आधार वाटत असेल ? सामान्याच्या चाकोरींतून थोडें बाजूला सरकण्याचा माणसाचा छंद, कांहीं मर्यादेपर्यंत तिलाहि मान्य आहे. परंतु तिच्यासारख्या समतोल वृत्तीच्या स्त्रीला सतत या अशा बेशिस्त, बेभरंवशाच्या माणसाबरोबर जीवन कंठावें लागणें, कायमच्या अशा या अनिश्चित परिस्थितीशीं जुळवून घ्यावें लागणें, याच्याइतकें दुःसह, सारें जीवन शोषून टाकणारें दुसरें काय असूं शकेल ? जिव्हाळ्याच्या माणसांत बेबनाव घडविण्यास येवढें पुरे आहे.

"आमच्या बाईसाहेबांचें मत तुझ्याबद्दल चांगलें झालेलें दिसत आहे बरं का," जिद मला पुनः पुनः म्हणत होता. मदाम जिदकडून माझें जें विशेष आदरातिथ्य केलें जातें, त्यानें तोहि फार खूष झाला आहे.

बहुधा जेवतांना आणि त्यानंतर ती आमच्या गप्पांत भाग घेते. तिच्या बोलण्यांतून तिची हुषारी चांगली व्यक्त होते. परंतु त्याचबरोबर या उभयतांचें एकमेकांशीं वर्तन किती विचित्रपणाचें आहे तेंहि जाणवतें. त्यांची आदब, अकृत्रिमपणा आणि मोजकेपणा यांचें चमत्कारिक मिश्रण, त्याचबरोबर एकमेकांबद्दल दाखवीत असलेली आस्था, जिव्हाळा दुसऱ्याला कांहीं कमी पडूं नये म्हणून घेतली जाणारी काळजी आणि त्यामुळें वाटणारें समाधान, याच्याच जोडीला या सर्वामागचा एक अनाकलनीय थंडपणा, मनाच्या गाभाऱ्यांतली गोठलेली वृत्ति, नुसता वैवाहिक जीवनांतल्या सर्वसाधारण जवळीकीचाच अभाव नव्हे तर केवळ दोन मित्रांमधील किंवा सहप्रवाशांमधील जिव्हाळ्याची उणीव ! एकमेकांबद्दलची त्यांची प्रीतिसुद्धां दुरावलेली, अबोल, अपरिचित भासते.

...... क्यु वे र वि ल च्या त्यांच्या घराची शोभा अवर्णनीय आहे. साधेपणा आणि सौंदर्याची आवड यांचें मोठें नयनमनोहर मिश्रण तेथें आढळतें. याचें सारें श्रेय मात्र मदाम जिदलाच द्यावयास हवें. घर स्वच्छ ठेवण्यासाठीं ती तासन् तास खपत असते. नीटनेटकेपणा, लखलखीत स्वच्छता या बाबतींतली हलगरज तिच्याजवळ मुळींच खपण्यासारखी नाहीं. जें जें म्हणून घासूनपुसून झुळझुळीत करणें शक्य आहे तें सगळें अगदीं आरशासारखें चकचकीत राखलें आहे. घरांतली लादी असो किंवा बाहेरच्या

मार्गावरील विटकरी फरशी असो, त्यावरून चालतांना स्केटिंग केल्यासारखें वाटतें. याचा उत्कृष्ट नमुना म्हणजे घरांतला जिना. गेलीं निदान ५० वर्षें अगदीं कसोशीनें पाळण्यांत आलेल्या एका पद्धतीनुसार, केंव्हांहि बघा, हातांत फ्लॅनेलचे तुकडे घेऊन, घरांतल्या मोलकरणी, एकसारख्या प्रत्येक कानाकोपऱ्यांतून, प्रत्येक नक्षीकामावरून, संथपणें हात फिरवीत असतात. पायऱ्यांच्या तांबड्या लादीपासून ते थेट कठड्यावरील नक्षी-कामाच्या बारिकसारिक उंचवट्यापर्यंत कांहींहि यांतून सुटत नाहीं. आज पिढ्यानुपिढ्यापासून त्यांच्यावर लावण्यांत येणाऱ्या मेणाचा जाड कडक थर आतां इतका पारदर्शी आणि चक-चकीत दिसतो, कीं तो जिना जणूं एखाद्या अति-शय किंमती पण गुळगुळीत दगडांतून कोरून काढलेला असावा असें वाटतें.

( ' ओतय'च्या बंगल्यांत जिद रहात होता, तिथली ती धूळ, अस्ताव्यस्त बिछाना, तोंड धुण्याच्या गिंडीची ती घाणेरडी फरशी,–यांची मला या क्षणीं आठवण येते. काय वर्णावा तो थाट ! )

जिद उठतो बसतो. त्या दोन खोल्या स्वयंपाक-घराच्या वर आहेत. तेथलें लांकूडकाम शेवाळी रंगाचें आहे. परंतु शक्य तितक्या अस्ताव्यस्त नियमशून्य पद्धतीनें राहण्यांत जिद बहाद्दर आहे. त्याच्या खोलीची तो तेंव्हांच राहुटी बनवितो. एक-मेकाशीं बिलकूल मेळ नसणाऱ्या फर्निचरच्या वस्तू इतस्ततः पहुडल्या आहेत. स्वप्नांतहि येणार नाहीं अशा भलत्याच कामाकरितां त्यांचा उपयोग केलेला आढळतो. खिडकीच्या पुढ्यांत एक जुनी संगमरवरी गिंडी उभी ठाकली आहे. तिच्यावर उंचच उंच पुस्तकांचे पर्वत रचले आहेत. एका सुरेख देवदारी टेबलाच्या कप्प्यांत खूपसे टॉवेल आणि चादरी चोंदून ठेवल्या आहेत. टेबलाजवळच्या उभ्या पाठीच्या खुर्चीवर मफलर आणि टाय दांडीवर टाकल्या-सारखे लोंबत पडले आहेत. कामाच्या वेळीं वेताच्या खुर्चीवर बसणें त्याला आवडतें. जोडीला एक नाजूकसें टेबल घेतो. शेगडींत अगदीं नांवालाच विस्तव असतो. पण पार त्या निखाऱ्यांच्या राखेंत तें टेबल नेऊन घुसडतो. तरीहि त्याच्या पायाला देखील त्याची ऊन्ह लागत नाहीं तें निराळेंच. तिथेंच, मदाम जिदनी धाडलेल्या एका आराम-खुर्चीत मी बसतों. आणि मग तासन् तास गप्पा मारण्यांत आम्ही घालवितो. हे दिवस किती सुखद असतात ! दिलखुलासपणें हंसत खिदळत, कल्पनेच्या स्वैर भराऱ्या मारीत, आम्ही अतिशय आनंदांत तो काळ घालवितो. त्याच्या जोडीला परस्परांबद्दलचा विश्वास, जिव्हाळा यामुळें त्याला वेगळीच गोडी निर्माण होते.

## योजनारहित लेखन

जिद सध्यां लिहित असलेल्या ' फो मोनेय्यर'चीं सुरुवातीचीं पानें त्यानें मला तेथेंच वाचून दाखविलीं. त्यांतले कांहीं उतारे अप्रतिम आहेत. कांहीं व्यक्तिरेखाहि उत्तम वठल्या आहेत. संवादांचे कांहीं तुकडे परिणामकारक आहेत. ' एद्वारच्या जुर्नाल'चीं पानें तर अनुपम आहेत. पण तरीहि त्यांतला फार मोठा भाग अगदीं पोकळ आणि कंटाळवाणा झाला आहे. असल्या या रटाळ भागाला आम्ही ' उथळ पाणवठे' म्हणतो. जिद स्वतःहि या मजकुरावर तितकासा खूष नाहीं. त्याची अशी कल्पना होती कीं, हीं सुरुवातीचीं प्रकरणें चांगलीं वठतील. निदान तीं इतकीं सपक होतील असें त्याला वाटलें नव्हतें. पण खरें म्हणजे मला तरी त्यांत कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. पूर्वरचित आंखणीच्या आधारानें लिहित जाणें, जिदला मुळीं माहीतच नाहीं. लिहितांना, आपण कोठें चाललो आहोंत, अगर कोठें जायचें आहे, याची कसलीच कल्पना त्याच्या मनांत तयार नसते. लिहावेंसें वाटलें कीं लिहितो. आणि मग त्यावेळीं जशी लहर लागेल तसा तो लिहित

जाणार. केवळ एखादी घटना खुलून दिसावी, किंवा एखादा खुमासदार संवाद घुसळून देतां यावा, म्हणून आतांपर्यंत न योजिलेली एखादी संपूर्ण नवीन व्यक्तिरेखा तो निर्माण करील. हें करतांना एखादे वेळीं त्याच्या मनापुढें अस्पष्ट अशी बाह्या-कृति उभी राहते. मग तिला रेखीव करण्याच्या भानगडींतहि तो पडत नाहीं. कादंबरींत तिला कोणतें स्थान द्यावें याचा विचारसुद्धां तो मनाशीं निश्चित करीत नाहीं. ही पद्धत मला तर बिलकुल पसंत नाहीं. कलेच्या परिसरांत रचनेचें महत्त्व फार मोठें आहे. बुर्देलनें या बाबतींत काय म्हटलें आहे तें मी त्याला सांगितलें. " सुसंवादी रचनेंत कलेचें श्रेष्ठत्व सांठविलेलें आहे. भाराभर बारकाव्यांच्या साहाय्यानें बेढब प्रमाणांनीं निर्माण झालेली विकृति सुशोभित करतां येत नाहीं." जिदला हें पटत नाहीं. आपली शिस्तशून्य लेखनपद्धतीच कशी चांगली आहे, हें ठरविण्याचा त्यानें अनेक मार्गांनीं प्रयत्न करून बघितला. माझ्या दृष्टीनें, केवळ त्याला हें असें करणें आवडतें म्हणून तो करतो. यापलीकडे त्यांत कांहीं अर्थ नाहीं. या पद्धतींतून निर्माण होणारी कलाकृति दोषरहित होऊं शकत नाहीं, हें त्याला पटत नव्हतें, पण आतां मात्र मान्य करणें भाग आहे. अर्थात वाद घातल्याशिवाय ही कबुली तो कधींच देणार नाहीं.

अतिशय प्रसन्न वातावरणांत आम्ही या प्रश्नाची चर्चा केली. शेवटीं बोलून बोलून दमलों. माझे विचार मला नीट मांडतां आले नाहींत. बराच अडलों आणि परस्परविरोधी विधानेंहि केलीं. पण मला जें म्हणावयाचें होतें तें माझ्या मनांत स्वच्छ होतें. तार्किक विधानांच्या कात्रींत इतक्या हुषारीनें जिद मला पकडीत होता, कीं त्यांतून मला जें म्हणावयाचें होतें तें बरोबर बाहेर पडलें.

## मृत्यूचा विचार

जान्युआरी १९२४

जिद: " हल्लीं हल्लीं एक क्षणहि असा जात नाहीं कीं जेव्हां मृत्यूचा विचार माझ्या मनांत नसतो. त्याबद्दलची कसलीहि कविकल्पना मी रंगवीत नाहीं. कांहींतरी प्रत्यक्ष स्वरूपांत माझ्यासमोर उभें ठाकलें आहे असें मला वाटतें. मी कुठेंहि असो, — कोणाला भेटावयाला जात असो, स्नान करीत असो अगर बसमध्यें बसलेला असो, — एकदम माझ्या मनांत येतें, " आत्तां, या क्षणाला, जर मला मृत्यू आला, तर ? " केव्हां वाटतें, " आत्तां मरण आलें, तर बरें होईल. " पण बहुतेक वेळीं मन म्हणतें, " नको, — नकोच ! " आणि मग दुसरीकडे माझें मन गुंतविण्याचा मी प्रयत्न करतों. हा विचार मनाला वेदना मात्र करीत नाहीं. उलट त्यांतून जीवनाबद्दलची आसक्ति जास्त तीव्र बनते. आणि जे लोक उगीच माझा वेळ घेतील असें वाटतें, किंवा ज्यामुळें माझ्या कामांत विघ्न निर्माण होण्याचा संभव असेल, त्यांना टाळून पुढें जावेंसें वाटतें. माझ्या आयुष्यांतला अल्पांशहि वांया घालवायला मी तयार नाहीं. "

## आपल्या छोकरीला खेळवतांना

मार्च १९२४

आपल्या छोकरीला खेळवतांना जिदला पाहण्यांत मोठी मजा असते. हें दहा महिन्यांचें पिल्लू जेव्हां जमिनीवर सरपटतें, किंवा जागच्या जागीं वळवळ करतें, तेव्हां वांकून तिचें निरीक्षण करतांना एखाद्या प्राणिशास्त्रज्ञासारखें त्याच्या चेहऱ्यावर औत्सुक्य असतें. स्वतःच्याच मनानें ती करीत असलेली हालचाल, तिच्या सूक्ष्म प्रतिक्रिया, या इवल्याश्या पण चलाख जीवाच्या सहज-प्रवृत्ति, तिचे तजेलदार, टकमक बघणारे डोळे, आपलें हांसूं लपविण्यासाठीं मान खाली वळवण्याची तिची ती विचित्र पद्धत, — या सगळ्याचें त्याला

विलक्षण आकर्षण वाटतें. आत्तांच आपल्या झेंपेच्या बाहेर असलेल्या वस्तू मिळविण्याचा तिला इतका छंद लागला आहे कीं, त्या प्रयत्नानें वेडावून जाऊन तिचे हात थरथर कांपूं लागतात. मुठी घट्ट मिटतात, अगदीं आसुसल्यासारखी ती आपले हात, लटपटत पण सरळ पुढें करते. आणि शेवटीं अगदीं उन्माद आल्यासारखें सारें शरीर पिळवटून काढते. हें बघतांना जिद आनंदानें वेडा होतो. तिच्या जिवाची ही घालमेल पाहण्याचा त्याला कधीं कंटाळा येत नाहीं. तिच्या खेळाच्या कोणी मध्यें आलेलें त्याला खपत नाहीं. कोणी असें केलें तर फार संताप येतो त्याला.

## प्रत्येक क्षणाचा उपयोग करणारा

१९२४

आयुष्याचा प्रत्येक क्षण जिद उपयोगांत आणतो. त्याची काव्यवृत्ति, सुखोपभोगाची आवड, विचार व कृतींतून प्रतीत होणारा त्याचा स्वतंत्र बाणा,– हें सर्व जमेला धरूनहि जिदच्या स्वभावांत आळशी-पणाला कोठेंच स्थान नाहीं. दिवस असो कीं रात्र असो, त्याचें मन निद्रिस्त झालें आहे, असा क्षण मिळणार नाहीं. त्याच्या डोक्यांत सतत कुठल्या तरी ग्रंथाची जमवाजमव सुरू असते. त्याच्या वाङ्मय-निर्मितीला कधींच खंड नसतो. प्रीतींचा खेळ खेळ-तांना सुद्धां, निसटता स्पर्श करून जाणारे ओझरते अनुभव देखील तो टिपून घेईल, आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शब्दसंहितेंत त्यांचें रूपांतर करील, आपलें वाङ्मय समृद्ध करण्याची आंस त्याला कायम लागलेली आहे. नजरेस पडलेल्या प्रत्येक फुलाचा आस्वाद तो घेईल. त्याच्या धुंदीनें बेहोष होईल. मात्र मधमाशीप्रमाणें प्रत्येक वेळीं परततांना मधुबिंदू आपल्याबरोबर आणल्याशिवाय राहणार नाहीं.

## जिवंतपणीं मरणाचा अनुभव

डिसेंबर १९२४

जिदला ज्यूलीच्या रुग्णालयांत भेटलों. त्याचें ॲपेंडिसायटिसचें ऑपरेशन व्हावयाचें आहे. यापूर्वी शस्त्रक्रियेचा त्याला अनुभव नाहीं. बरोबर असो वा नसो, पण त्याच्या मनानें मात्र घेतलें आहे कीं आपण आतां यांतून वांचत नाहीं. मनांतून तो मृत्यूचीच तयारी करीत आहे. विशेषसा प्रतिकार न करतां, मरणाची कल्पना आपलें मन इतक्या सहज कशी पचवूं शकतें याचा त्याला विस्मय वाटतो. मला तो म्हणाला, "खरें म्हणजे मरण, मी पूर्वीच अनुभविलें आहे. माझ्या बंधनांतून मुक्त होण्याकरितां म्हणूनच कीं काय, माझ्या पत्नीनें माझीं सर्व प्रेमपत्रें जाळून टाकलीं, तेव्हांच खरा माझा अवतार संपला. त्यावेळीं जो असह्य मनस्ताप मला सहन करावा लागला, त्यानें मी करपून गेलों... माझ्या पत्नीचाच विचार सध्यां एकसारखा माझ्या मनांत असतो. तिला ही माझी भावना कधींच कळणार नाहीं."

## अलीकडची असहिष्णुता

१९२८

अलीकडे जिद फार असहिष्णु बनत चालला आहे. त्याचा हा चिडखोरपणा मला बिलकुल पसंत नाहीं. कुठल्याहि टीकाकाराची लहानशी चूक त्याच्या नजरेला आली, किंवा त्याच्याबद्दलच्या टीकात्मक लेखांस थोडासा अनादराचा वास आला तरी त्याला फार राग येतो. मग सरळसरळ त्याच्या-वर कोणी हल्ला केला म्हणजे तर विचारूंच नका.

त्याला कोणी विशेष मानीत नाहीं. व गरसमजु-तींनी अधिक्षेप करीत होते, अशीं जवळ जवळ तीस वर्षें त्याला काढावीं लागलीं. पण हा सर्व काळ, धीरगंभीर, अविचल, आनंदी वृत्तीनें त्यानें काढला. कधीं त्याबद्दल कुरकूर केली नाहीं. पण आतां मात्र त्याचा सूड घेण्याचा मोह त्याला अना-वर होतो. आणि यामुळेंच, येवढ्याश्या हुंकाराचेहि सहस्र कर्णकटु प्रतिध्वनी उठणारें तें लहानसें साहित्य जगत्, सध्यां त्याच्या कुरकुरीनें आणि त्यानें निर्माण केलेल्या वादांनी दुमदुमून गेलें












आहे. या सगळयाबाबत जरा जास्त अलिप्तपणा स्वीकारून त्याकडे तो दुर्लक्ष करूं शकला, तर फार बरें होईल.

( आपल्यामागें लोक आपली प्रतिमा कशी रंगवतील या विचारांत तो सध्यां गढलेला आहे. आपल्याच हातानें ती रंगवून लोकांची त्याला मान्यता मिळवावी अशी त्याची इच्छा आहे. माझ्या दृष्टीनें हा निव्वळ कालाचा अपव्यय आहे. मृत्यूनंतर बनविला जाणारा आपला मुखवटा कसा असावा याचें मार्गदर्शन कोणीच माणूस स्वतः करूं शकत नाहीं. )

### माझा तरुणांवरील उदात्त प्रभाव

३० जुलै १९३१

जिद आज मला भेटला तेव्हां संतापानें तो क्षुब्ध झाला होता. त्यानें मला एक पत्रक दाखविलें. त्यांत तो तरुण मुलांना वाईट मार्गाला लावीत आहे असा आरोप होता. याच्याइतका दुसऱ्या कशानेंच त्याचा पारा चढत नाहीं. तीव्र संताप, असीम दुःख, आणि कमालीची उद्विग्नता यांनी त्याच्या मनाचा पुरता ग्रास घेतला आहे.

" तरुण मुलांना मी नादीं लावतो, काय ? तथाकथित शिष्टसंमत मार्गानें जाणाऱ्या या लोकांना यांतून काय ध्वनित करावयाचें आहे तें मला समजत नाहीं का ? स्त्रीच्या प्रीतीचा हे पाठलाग करतात तेव्हां त्यांना तिच्यावर मालकी हवी असते. आणि त्यामुळेंच ते असें धरून चालतात कीं, कोणा तरुण मुलाची प्रीति संपादन करण्याचा कोणी प्रयत्न करूं लागला, कीं तो त्याला बिघडविणारच, त्यांच्या विचारांची धाव इतकीच जाऊं शकते. " तरुण मुलांना बिघडविणें " याचा खरा अर्थ म्हणजे लहान कोंवळया वयांत त्यांची मनोवृत्ति विकृत करून टाकणें, आणि त्यांच्या निष्पाप भाबड्या स्वभावाचा फायदा करून घेणें ! यांना मी कसें पटवून देऊं कीं निदान माझ्या बाबतींत — आणि मी म्हणजे अपवाद नव्हे — याच्याइतकें असत्य दुसरें नाहीं ? ' हें असें मी करीत नाहीं ' असें मी त्यांना म्हटलें तर केवळ कुत्सितपणें ते माझ्याकडे बघून हंसतील. जर खरोखरी हें सर्व मला सांगतां आलें, — तारीख, वार, नांवासकट प्रत्यक्ष घटना मला उघड करून दाखवितां आल्या, तर त्यांना समजून येईल कीं ते करीत असलेले आरोप किती अनाठायी आहेत. तरुण, कोंवळया जीवाबद्दल वाटणाऱ्या आदरामुळें मी कित्येक वेळां मन आवरलें आहे. अनेकदां तर प्रीति अर्पण केली गेली असूनहि, महिनेच्या महिने मी वाट बघितली आहे . . . आणि म्हणे, मी मुलांना बिघडवितो ! जणूं प्रीतींतलें सुख लुटावयाची शिकवण देणें हा गुन्हा आहे. तसें तर नाहींच, उलट आहे. त्या स्पर्शामागें कोणती भावना असते, तें हे लोक विसरतात. -कदाचित् त्यांना त्याचा अनुभवच मिळाला नसेल. परस्परांबद्दलचा विश्वास, इमानीपणा, उदात्त अनुकरण यांच्या सहवासांत हा स्नेह जागा होत असतो, त्याला उधान येत असतें. — रोजे, मी बोलतो त्यावर विश्वास ठेव. माझ्याकडे आलेल्या तरुण मुलांवर माझा जो कांहीं प्रभाव पडला असेल, तो संपूर्ण निरोगी आणि कल्याणप्रद असाच होता. माझ्या या म्हणण्यांत कसलाच विरोधाभास नाहीं. मी नेहमी नीतीचीच बाजू घेत आलो आहे. त्यांची सद्सद्विवेकबुद्धि जागी होऊन तिची योग्य वाढ व्हावी असाच माझा प्रयत्न असतो. त्यांच्यामध्यें जें चांगलें असेल, त्याला उजळा मिळावा, यासाठीं मी झटतों. कांहीं वेळां त्यांच्यापैकीं कांहीं मुलांना वाईट संवयी लागल्या आहेत असें मला आढळून आलें. त्यावेळीं त्यांना पुनः सन्मार्गाला आणून मी सोडलें आहे. मी नसतो तर नीच प्रवृत्तीच्या आधीन होऊन त्यांनी स्वतःचा पुरा नाश करून घेतला असता. अनेक, दुबळ्या, भेंकड, आळशी, ढोंगी, लबाड मुलांना माझ्या उपदेशानें नीट








चळण लागलें, आणि कष्ट, नीटनेटकेपणा, सुबक-पणा, यांची आवड त्यांच्या मनांत रुजली गेली. हें सर्व घडूं शकलें, याला कारण केवळ एकमेकांबद्दल वाटणारें आकर्षण आणि जिव्हाळा !... पण, हें मी लोकांना कसें पटवून देऊं ? "

त्यानें नांवें सांगितलीं, प्रत्यक्ष उदाहरणें वर्णन केलीं, एकामागून एक पुरावे पुढें केले. त्याच्या दृष्टीनें ग्रीकांना प्रिय असणाऱ्या या प्रीतिमार्गाचें गुणवर्णन करतांना, तो विलक्षण भावनावश झाला होता. त्याच्यामतें, वयांत येण्याच्या सुमाराच्या खळबळजनक काळांत, प्रेम आणि विश्वासास पात्र ठरूं शकेल अशा वयस्क पुरुषाच्या शारीरिक, वैचारिक आणि नैतिक सहवासाची सर दुसऱ्या कशालाच येणार नाहीं. "वाईट वस्तींत भेटणाऱ्या मोहांपासून त्यांना परावृत्त करावयाचें असेल, अगर वेश्येच्या शय्येवर जमा केल्या जाणाऱ्या गलिच्छ आणि हानिकारक देणग्यांपासून जर त्यांचें रक्षण व्हावयास हवें असेल, तर मी म्हणतो त्या पद्धतीनेंच याचें ज्ञान त्यांना द्यावयास हवें. "

## सामाजिक क्रांतीची अविचारी आस.

जुलै १९३२

मृत्यूची कल्पना त्याच्या मनांतून अजून जात नाहीं. त्याचे सारे विचार त्या भोंवतींच घोटाळत असतात. " मला मरून जावेसें वाटतें, असें नाहीं. पण अलीकडे बऱ्याच वेळां, आणखी जगायची इच्छा मात्र उरत नाहीं. " जगाची भराभर होणारी प्रगति, विचार व सामाजिक संस्थांचा विकास याबद्दल तो बोलत होता. या सर्वांचें आकलन होणें कठीण जातें आणि त्यामुळ आपण फार मागासलेले राहतों अशी त्याची स्वत:बद्दल तक्रार होती. ज्या सामाजिक क्रांतीसाठीं तो आसुसलेला आहे, तिची पूर्ति झालेली ' याचि देहा याचि डोळा ' बघण्याचें नशिबांत नाहीं ही जाणीव त्याला अलीकडे होऊं लागली आहे. कदाचित् त्यामुळेंच जीवनापासून तो दूर सरकत असेल. पुढें तो मला म्हणाला, " याच कारणामुळें इतक्या निष्ठेनें, इतक्या अविचारानें ( त्याचाच शब्द ) मी कम्युनिस्ट पक्षांत स्वतःला गुंतवीत आहे. " ( त्याच्या मतें, शांतपणें विचार करून त्या पक्षांत जाण्याचा निर्णय घेण्याइतका अवधीच त्याला उरलेला नाहीं. आयुष्याच्या उतरणीला लागल्यावर या असल्या अविचाराचें महत्त्वहि तितकेंच. )

## धक्का देणारें मोठेंपण

१९३३

'रिव्हाज द नेआं, ' (Rivages de neant) मधील एका पात्राबद्दल, देनिज फॉंतेन ( Denise Fontaine ) म्हणतो, " आपण त्याच्याबद्दलचें मत बनवितांना त्याला लागूं न पडणारी फूटपट्टी लावतो. तो फार मोठा आहे हें आपल्याला मान्य असतें, परंतु त्यानें आपल्या कल्पनांप्रमाणें मोठें असलें पाहिजे असा आपला अट्टाहास असतो. त्यानें आपल्यापेक्षां खूप पुढें असावें अशी आपली इच्छा असते. पण त्यानें आपल्याच मार्गानें पुढें गेलें पाहिजे असा आपण आग्रह धरतो. तो कांहींतरी निराळा आहे, असामान्य आहे, याचें आपण कौतुक करूं. पण तो आपल्यासारखा नाहीं या विचारानें आपल्याला धक्का बसतो. त्यानें ज्याप्रकारचें अलौकिक नैपुण्य प्राप्त केलें आहे तसें इतर कोणांत आढळत नाहीं. "

## संप्रदायांत न मावणारा मोठेपणा

जिस-एप्रिल १९३४

राजकारण, सामाजिक घडामोडी, साम्यवाद इत्यादि अनेक विषयांचा आम्ही ऊहापोह केला. मी त्याला तसें म्हटलें नाहीं, पण मला वाटतें त्याच्या नव्या विचारांपासून तो थोडा थोडा बाजूला सरकूं लागला आहे. त्यानें स्वत: घालून घेतलेल्या मर्यादेचें उल्लंघन आपल्या साम्यवादी दोस्तांच्या सहवासांत तो अनेक वेळां करतो. माझ्याशीं

बोलतांना मात्र, उत्साहाच्या भरांत आपण वहात जाऊं नये याची फार काळजी घेतो. मोकळया मनानें आत्मपरीक्षण तो करूं शकतो. लोक समजतात इतका तो कट्टर साम्यवादी नाहीं, ही गोष्ट तो माझ्यापासून लपवीत नाहीं. त्याच्यांत व त्याच्या लढाऊ वृत्तीच्या साम्यवादी स्नेह्यांत खूप अंतर आहे, असें म्हटलें तर त्यांना पटणार नाहीं. रशियन प्रयोगाबद्दलचा त्याचा दृष्टिकोण सहानुभूति-शून्य आहे, अगर मार्क्सवादावरचा त्याचा विश्वास उडाला आहे, असें मला सुचवावयाचें नाहीं. विश्लेषण करण्याची त्याची शक्ति फार मोठी आहे. एकजात सगळ्या पोथीनिष्ठ संप्रदायांचा त्याला मनापासून तिटकारा आहे. अनेक परस्परविरोधी भूमिकांचा समन्वय साधण्याची तारेवरची कसरत करण्याचा त्याला छंद आहे. शंकेला ज्यांत थारा असूं शकत नाहीं, अगर ज्याला दुसरा पर्याय असूं शकत नाहीं अशा साम्यवादी तत्त्वज्ञानाच्या सहवासांत त्याचें चित्त यामुळेंच रमत नाहीं. जिदवर इतकें विसंबून राहण्यांत पक्षाची दिशाभूल तरी झाली असावी, किंवा त्याचा आत्मविश्वास तरी जबर असावा. ज्याला मुळांतच निष्ठा माहित नाहीं, आणि आजचें मत बिनदिक्कतपणें उद्यां जो पालटतो, त्याच्या सभासदत्वाला इतकी किंमत देणारे हे लोक शहाणे कसे म्हणावयाचे ? सध्यांची त्याची पक्षाबद्दलची सहानुभूति लक्षांत घेऊनहि मला असें वाटतें कीं आपल्या या नव्या दोस्तांची तो लवकरच निराशा केल्याशिवाय राहणार नाहीं.

## जिदचें शब्दचित्र

१९३४

जिदचें शब्दचित्र देण्याचा प्रयत्न केलेल्या एका वाङ्मयात लेखाचा मी उल्लेख केला. हंसून तो मला म्हणाला, " ज्यांनी मला अजून पाहिलेलें नाहीं, त्यांना तें चित्र अगदीं हुबेहुब वाटलें ! "

## जिदचा पक्षपातीपणा

१९३४

जिदचीं मतें नेहमींच अगदीं निःपक्षपाती असतात, असें नाहीं. विशेष महत्त्वपूर्ण विषयांचे बाबतींत त्याचें बोलणें नेहमींच अतिशय काटेकोर आणि सत्यान्वेषी असतें... पण लहानसहान गोष्टीं-बाबत मात्र तो तितका जपून बोलत नाहीं.... उदाहरणार्थ, एखादें पुस्तक सहज जातांजातां नुसतें चाळलें असतांनाहि, त्यावर आपला जोरदार अभिप्राय ठोकून देण्यास तो कमी करणार नाहीं. एखाद्या मासिकाचें धोरण त्याला पसंत नसेल, तर त्याचें पानहि न उलटतां, त्यावर बिनदिक्कतपणें तो प्रतिकूल टीका करील. रोमन कॅथालिक पंथाशीं संबंधित असलेल्या कुठल्याहि प्रकाशना-बाबत तो खुशाल अनाठायी आरोप करील. आणि तेंच प्रॉटेस्टंट पंथीय असेल, तर न वाचतांहि त्यांत दोष नाहींतच असें समजून चालेल. एखाद्या टीका-कारानें दहा वर्षांमागें जरी त्याच्यावर अश्लाघ्य टीका करून त्याला दुखविलें असेल, तर त्यानंतरच्या त्याच्या सर्व वाङ्मयाकडे पाहण्याची त्याची दृष्टी गढुळ राहील, आणि आपला त्याबाबतींतला संशय तपासून पाहण्याचाहि तो कधीं प्रयत्न करणार नाहीं. (पण तेंच, एखादा अपमान तो इतका विसरूं शकतो कीं कोणा माणसानें सहाच महिन्यापूर्वी त्याच्यावर जरी नीच, असंस्कृत टीकेचा हल्ला चढविला असला तरी आतां त्याच्याशीं अगदीं प्रेमानें हस्तां-दोलन करील, लहरींत असला, आणि एखादी चूक जरी दाखवून दिली, तरी खिलाडू वृत्तीनें हंसून ती कबूलहि करूं शकेल ).

## मनाची परस्परविरोधी अवस्था

१९३७

जिद: " माझी कल्पनाशक्ति स्वैर उधळूं लागल्याची ज्या ज्या वेळीं मला शंका येते, तेव्हां तेव्हां मी स्वतःला आवरून धरण्याचा आटोकाट

प्रयत्न करतो. अशावेळीं अतिशय जागृत रहावें लागतें. माझ्यांत एक विशेष गुण असा आहे कीं, कल्पनेच्या पंखावर आरूढ होऊन स्वैर भराऱ्या घेत असतांनाहि जमिनीवर माझे पाय मी पक्के रोवून ठेवूं शकतो. कविकल्पनांत रममाण होऊन जीवनाबद्दलचा आपला दृष्टिकोन बदलत नाहीं ना, याची मी अतोनात खबरदारी घेतों... उदात्तीकरण करतांनाहि जीवनाचें वास्तविक स्वरूप माझ्या नजरेआड मी होऊं दिलेलें नाहीं. एका बाजूला तर्ककर्कश वृत्ति, आणि त्याचबरोबर दुसरीकडे भावनावशता, विचाराची, भाषेची पारदर्शिकता, किंवा आवेग, उन्माद, काव्याच्या स्रोतानें होणारें मनाचें स्पंदन, अशा अगदीं भिन्न परस्परविरोधी अवस्था एकाच क्षणीं एकत्र अनुभविण्याची माझी शक्ति कांहींतरी असामान्य आहे, अशी दिवसेंदिवस माझी पक्की खात्री पटत चालली आहे."

## अलीकडचा चक्रमपणा

१९३७

निकटच्या स्नेह्यांबरोबरचे असलेले जिदचे संबंधहि अलीकडे बिघडत चालले आहेत, हें नमूद करतांना मला फार वाईट वाटत आहे. त्याला आमच्याबद्दल जसा विश्वास वाटतो, तसा आम्हांला त्याच्याबद्दल वाटेनासा झाला आहे. त्याच्याबरोबरच्या खाजगी संभाषणांचे त्यानें आपल्या 'जूर्नाल' मध्यें केलेले उल्लेख वाचतांना आम्हांला बरें वाटत नाहीं. त्याच्याबरोबरचा आमचा स्नेह दुरावत जाण्याचें हें एक कारण आहेच. पण त्याच्याहिपेक्षां वाईट म्हणजे रोजच्या वागण्यांत तो जो कमालीचा चक्रमपणा करतो त्यानें होणारी आमची चमत्कारिक परिस्थिती ! त्याच्या या विचित्रपणापुढें केव्हांकेव्हां अगदीं हात टेंकावे लागतात.

१९३७

त्याचा हा छांदिष्टपणा, लहरीपणा, म्हणजे सगळ्यांना एक तापच होऊं लागला आहे.

केव्हांहि पहा, आयुष्यातल्या बारिकसारीक काळज्यांनी तो सतत व्यग्र असतो. तीं त्याचीं दुःखें काल्पनिक आहेत, किंवा तो स्वतःच तीं निर्माण करून घेतो, असें मला म्हणावयाचें नाहीं. पण त्यांपासून स्वतःला किती त्रास करून घ्यावयाचा, अगर दुसऱ्याला किती छळावयाचें, याला कांहीं मर्यादा नाहीं कां ? आतां हेंच पहा — त्याला निद्रानाशाची व्यथा जडल्यानें दुपारच्या जेवणानंतर थोडी झोंप त्याला आवश्यक वाटते, हें खरें. पण दुपारच्या, या वामकुक्षीसाठीं काय घरांतल्या झाडून साऱ्या बिछान्यांवर आणि कोचांवर निजून पहावयाला लागतें ! आणि त्याच्यासाठीं सगळें घर अगदीं मृतवत झाल्याप्रमाणें गप्प झालें पाहिजे, इतकी शांतता लागते होय ? तसेंच त्याला हल्लीं पथ्य पाळावें लागतें, हें कबूल. पण पानावर बसला कीं तेवढें निमित्त करून तो इतर सगळें संभाषण रोखून धरील. आणि अगदीं गंभीरपणें पण अतिशय कंटाळवाणेपणानें, प्रत्येक पदार्थाच्या गुणदोषाची चर्चा करील. त्याचे जिभेचे चोचले तर फार वाढले आहेत. प्रत्येक पदार्थ पचायला हलका पण चवीला मात्र रुचकर झाला पाहिजे ! ... त्याला थंडी फार लवकर बाधते, आणि म्हणून हवामानांत कोणताहि एकदम बदल झाला तर त्यापासून खबरदारी घेणें त्याला आवश्यक असतें. पण त्याचे तरी किती लाड करावयाचे. तोच एक नाद लागल्यासारखा झाला आहे त्याला. एकदम थंडी पडेल या भीतीनें तो खूप कपडे चढवितो. आणि मग आतां घाम फार येईल म्हणून नेमकें जेव्हां नको तेव्हां ते कपडे काढून टाकतो आणि त्यामुळें एकसारखा तो त्याचीं तीं असंख्य जाकिटें स्वेटर, मफलर, मोजे —सारखे घालत असतो आणि काढत असतो. कुठेंहि बाहेर पडला कीं चिक्कार ओव्हरकोट आणि ब्लँकेटस् तो लपेटून घेतो आणि मग चालतांना त्यांतून आंतबाहेर डोकावणारे त्याचे








पाय फार विचित्र दिसतात ...... सिनेमाला गेला, तर तीनचार वेळां तरी कमींतकमी तो खुर्ची बदलल्याशिवाय रहाणार नाहीं. कधीं एकदम रेडिएटरच्या जवळ जाईल, तर लगेंच फार गरम होतें म्हणून लांब जाऊन बसेल. नाहींतर, बाहेरचा दरवाजा एकदम उघडला तर काय घ्या, थंडीनें गारठून जायचा, या भीतीनें दरवाजापासली जागा सोडून दूर जाऊन बसेल. मला आठवतंय, एकदां आम्ही 'रेकामिए' थिएटरमध्यें गेलों होतों. तिथें गेल्यावर त्यानें माझा हातरुमाल मागून घेतला. आणि काय करावें पठ्यानें ! दिवे लागल्यावर बघितलें मी, तर आश्चर्यचकितच झालों. माझ्या रुमालाला चारी टोकांना गांठी मारून, कापडाची घडी घालतात तसा डोक्यावर तो रुमाल त्यानें ठेवला होता ! आजूबाजूच्या लोकांना काय, मजाच होती बघायला. एकदां तर, थिएटरमध्यें दिवे गेले, अंधारांत तो हळूंच माझ्या कानांत कुजबुजला, कीं जरा जास्त खबरदारी म्हणून, पॅंटच्या आंत त्यानें लोकरीच्या चड्डयांच्या दोन जोड्या घातल्या आहेत. "बघ दोस्ता, जरा जर थोडी मदत करशील, तर अंधारांत, कोणाला कळूंहि न देतां, आपण त्या ....." जर हा भयंकर बेत सोडून दिला नाहींस तर याद राख, असा जेव्हां मी दम भरला तेव्हां स्वारी गप्प झाली !

"लोक काय म्हणतील" हा विचार माझ्या आपल्या दुबळया मनांत नेहमी जागा असतो. आणि अलीकडे तर जिदबरोबर बाहेर पडावयाच म्हणजे सगळयांच्या चेष्टेचा विषय व्हावयाचें. मला तर तें बिलकूल सहन होत नाहीं. आम्ही घरीच असलो, आजूबाजूला कोणी नसेल तर त्याचा हा चक्रमपणा मी चालवून घेतों, इतकेंच नव्हे तर त्यापासून माझी करमणूक होते. त्याच्यावरून मी त्याची खूप चेष्टाहि करतो आणि जिद स्वतःहि खिलाडू वृत्तीनें त्यांत भाग घेतो. गप्पा मारतांना कंटाळा आला कीं त्याच्यावर आमचा हा तोडगा असतो. (आम्ही बोलत होतों, इतक्यांत एकदम तो आपल्या वाहीशीं चांचपडतांना दिसला. थोडा खोंकला, खांकरला, आणि मग माझ्या बोलण्यावरचें त्याचें लक्ष उडालें. कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडे तिकडे बघूं लागला. "तुझे हातमोजे कां सांपडत नाहींत ?" मी त्याला विचारलें. "ते तिथें आहेत. – तुझ्या अंगावरच्या शालीच्या घडींत पडले आहेत." मी ते काढून दिले तो एकदम शांत झाला. आणि पुन: पूर्वीच्या दमांत आमच्या गप्पा सुरूं झाल्या ).

## पत्नीचें निधन

बेलेम १९३८

'तेर्न्रे'ला जिदबरोबर घालविलेले गेले आठ दिवस फार चांगले गेले. पूर्वीपेक्षां आम्ही एकमेकांच्या फार जवळ आलो.

कांहीं दिवसांपूर्वीं त्याची पत्नी निधन पावली. हें दुःख सहन करतांना तो विलक्षण संयम दाखवीत आहे. इतका दुःखाचा कडेलोट झालेला त्याच्या आयुष्यांतला हा पहिलाच प्रसंग आहे. शस्त्रक्रियेमध्यें पाय तोडून टाकलेला मनुष्य ज्या धैर्यानें आपल्या त्या बुरखुंडाची संवय करून घेण्याचा प्रयत्न करतो, तशी जिदची अवस्था झाली आहे. केव्हां केव्हां स्मृति जाग्या होतात. आणि त्यांचा दंश मनाला फार वेदना देतो. परंतु तेंच अनेक वेळां या घटनेचा त्याला इतका विसर पडतो कीं, नेहमीच्या संवयीनुसार रोजच्या डाकेंत पत्नीचें हस्ताक्षर कोठें आढळतें कां तें तो बघूं लागतो. बहुधा एक-दोन दिवसाआड तिचें पत्र आल्याशिवाय रहात नसे.

तिच्यासंबंधीं तो खूप बोलला आज. त्यांनी एकत्र घालविलेले अलीकडचे कांहीं दिवस आणि मागचा काळ यासंबंधीं बोलतांना त्यानें आपलें मन माझ्याजवळ मोकळें केलें. मी त्याला तसें म्हटलें नाहीं, परंतु मला मात्र असें आश्चर्य वाटलें कीं, त्याच्या












या दुःखांत अपराधाची कसलीच जाणीव नव्हती. कधीं पश्चात्ताप झाल्याचेंहि दिसलें नाहीं. त्याच्या दृष्टीनें तर तिला जें दुःख सहन करावें लागलें, ज्या पद्धतीनें कायम मन मारून रहावें लागलें, त्याला तो बिलकूल जबाबदार नव्हता. त्याचा दोष त्याच्या माथीं बसूं शकत नाहीं. " मी हा असा होतो, ती तशी होती. त्यांत बदल होणें शक्य नव्हतें. परिणामीं आम्हां दोघांच्या वाट्यांला अपरिमित दुःख आलें. यांतून दुसरें कांहीं घडण्यासारखें नव्हतेंच. "

आपल्या आधीं गेल्यानें आपल्यामागून सहन कराव्या लागणाऱ्या यातनांतून तिची सुटका झाली, हा विचार त्याचें दुःख हलकें करतो. तिच्या अखेरच्या दिवसांत तो तिच्याजवळच होता. त्या आठवणी आणि क्युवेरव्हिलला एकत्र घालविलेल्या दिवसांच्या सुखद स्मृति यांचा तो वारंवार उल्लेख करतो.

तिनें मागें कांहीं लिहून ठेवलें नाहीं. जिदसाठीं पत्र नाहीं किंवा रोजनिशीहि नाहीं. तिला किती सहन करावें लागलें, जिदच्या मनाचा कितीसा थांग तिला लागला होता, तिच्या मनांत संशय किती रुजला होता, कोणत्या गोष्टी कानावर येऊं नयेत असें तिला वाटत होतें, आणि तरीहि तिला काय काय समजलें होतें, कशाबद्दल तिनें क्षमा केली आणि कशाबद्दल नाहीं, — यांचा कसलाच तलास कोणाला लागणार नाहीं. तिनें जें मनाच्या आंतल्या कप्प्यांत बंदिस्त केलें होतें, तें तिच्याबरोबरच गेलें.

या गेल्या आठ दिवसांत आम्ही कित्येक विषयांवर गप्पा मारल्या. तो जें जें बोलला, ज्या पद्धतीनें त्यानें आपले विचार मांडले,—त्याच्या आवाजांतले चढउतार, त्याच्या मनाची ती अनाकलनीय गुंतागुंत, —हें सर्व आठवतां आलें तर मला हवें आहे. वरवर पाहिलें तर क्षणैक भावनेच्या भरांत त्याचें मन वहात जातें असें वाटेल. पण तसें नसून, कांहीं विशिष्ट, केवळ त्यालाच लागूं पडतील, — अशा सुप्त नियमांनीं तें बांधलें गेलें आहे. कोणाशीहि बोलतांना, बोलणाराशींच नव्हे तर स्वतःशींहि जिदचा लपंडाव चालू असतो. त्याचें बोलणें एकसारखें, सरळ ओघांत चालत नाहीं. आठवणी, ऐकीव कथा, खुमासदार चेष्टामस्करी — हें मधूनमधून पेरीत जेव्हां तो पुढें जातो, तेव्हां करमणुकीसाठीं चार घटका एखादा खेळ खेळावा तसें वाटतें. बोलतां बोलतां सहज विषयाला कलाटणी देणें, बारिकसारिक गोष्टी शक्य तितक्या खुलवून सांगणें, मध्येंच गप्प होणें, अडखळणें, एकदम झटक्यांत पुढें सरकणें आणि तितक्याच झपाट्यानें मागें परतणें, — या पद्धतीनें त्याच्या गप्पा सुरू असतात. लीनपणा आणि तुच्छता, अबोल वृत्ति आणि मोकळेपणा, अनपेक्षित स्पष्टोक्ति आणि अतिसूक्ष्म सूचक उल्लेख — अशा सर्व विरोधांनीं त्याचें संभाषण भरलेलें असतें. कधीं सरळ एका रेषेंत गेल्यासारखा, तर कधीं चक्रव्यूहांतल्याप्रमाणें कमालीच्या गुंतागुंतीच्या पद्धतीनें — पण शेवटीं तो आपला मुद्दा स्पष्ट केल्याशिवाय रहात नाहीं. अखेरीस, ऐकणाऱ्याला स्तंभित करून टाकील, इतक्या सुलभतेनें, थोड्याश्या मोजक्या वाक्यांत येवढ्या जटिल प्रश्नाची उकल तो करील. परंतु हें करण्याची गर्दी मात्र बिलकूल नाहीं. या चर्चेंत त्याला इतकें सुख वाटतें, कीं रमत गमत, संभाषण खुलवीत सावकाश तो पुढें सरकत असतो.

**वृद्धावस्थेंतील तडफ**

पॅरिस, ऑगस्ट १९४५

१९४२ मध्यें जिद उत्तर आफ्रिकेंत गेला, तेव्हांपासून आतांपर्यंत तीन वर्षांत त्याची माझी गांठ-भेट नाहीं.

वार्धक्याचा त्याच्यावर बिलकूल परिणाम दिसत नाहीं. वयाला ७६ वर्षें झालीं असूनहि, त्याची तडफ वाखाणण्यासारखी आहे. एकदम पाहिल्याबरोबर असें वाटतें कीं त्याच्यांत कांहींच बदल



अनुक्रमणिका






झालेला नाहीं. जरा कृश वाटतो, पण अजून पूर्वी-इतकाच तडतडीत, चपळ, चळवळया, सगळयाची आवड असलेला आणि सतत उद्योगांत गढलेला, असाच तो दिसतो. जणूं कालच आम्ही एकमेकां-पासून दूर गेलो होतो, इतक्या सहजपणें जुन्या मैत्रीचा धागा उचलून आम्ही पुढें निघालो.

## शब्दावलीचा गुंजारव

पॅरिस, मे १९४७

आतांइतका जिव्हाळा जिदच्या वागण्यांत पूर्वी कधींच दिसला नाहीं. माझ्या रक्तवाहिन्या नीट काम देत नसल्यानें, फारशी ऊठबस मी करूं शकत नाहीं, हें पॅरिसला आल्यापासूनच त्याच्या लक्षांत आलें असावें. आणि त्यामुळें हल्लीं तोच माझ्याकडे येतो.

जेवणानंतर सहसा कधीं न बाहेर पडणारा, पण हल्लीं मात्र बहुधा रात्रीच्या जेवणानंतरच तो माझ्या-कडे येतो. त्याच्या विशिष्ट संवयीप्रमाणें तो तिनदां दारावरची घंटा वाजवितो.

“ माझ्या येण्यानें कांहीं व्यत्यय तर नाहीं ना आणत मी ? तसें असतें तर बाकी तूं म्हणाला असतास, नाहीं कां ?” असें विचारीत आंत येऊन बसेल. मग मी त्याच्या आवडीचा संत्र्याच्या फुलांचा चहा बनवितो. अलीकडे नेहमी तो जवळ बाळगतो तें ‘ इनिड ’ खाकोटीला मारून रात्रीं ११ च्या सुमारास तो घरीं परततो. लहान लहान पावलें टाकीत, तो ‘ ऱ्यू वानो ’ ( Rue Vaneau ) कडे कसा जात असेल याचें चित्र माझ्या डोळयांसमोर उभें राहतें. अनेकदां त्याला तसें जातांना मी बघि-तलें आहे. मध्येंच रस्त्यांतल्या दिव्याखालीं तो क्षण-भर थांबेल, एखाद्या परिच्छेदाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करील, आणि पुढें चालूं लागेल. चालतां-चालतां त्याला सुचलेल्या फ्रेंच भाषांतरावर विचार करील, तोंडानें तें म्हणूनहि बघेल.

काल त्यानें मला, ऑक्सफर्डच्या ऑनररी डॉक्टरे-टच्या पदवी स्वीकारण्याच्या समारंभाचे वेळीं तो करणार असलेलें भाषण वाचून दाखविलें. मांडणी सुरेख आहे, पण त्यांतले विचार अगदींच सुमार आहेत. शक्य तितक्या बेतानें मी हें त्याच्या नज-रेला आणून दिलें. माझें म्हणणें मोठ्या उमदेपणानें त्यानें मान्य केलें. पण आतां त्या स्पष्टवक्तेपणा-बद्दल माझें मलाच वाईट वाटत आहे. “ अरे, खरंच कीं, रोजे, तुझें म्हणणें बरोबर आहे हं ! ” जिद मला म्हणाला, “ केवळ वेठ मारून लिहल्या-सारखें माझें हें भाषण तिथें मी करणें, म्हणजे मूर्खपणाच ठरेल. उद्यां मी ऑक्सफर्डला तार करून टाकतो कीं, त्यांनीं माझ्यावर विसंबूं नये. नकोच मला ती डॉक्टरेट. ”

त्याचा बेत बदलेल, अशी मला आशा आहे. बहुधा, ती तार पाठविण्याच्या आधीं तो पुनः एकदां आपलें भाषण वाचून पाहील. आणि एकदां त्याच्या त्या शब्दसंहितांचा नाद त्याच्या कानांत घुमूं लागला, कीं शैलीच्या अनुपम सौंदर्यानें मोहून जाऊन माझ्या टीकेचा त्याला विसर पडेल. आणि त्याच्या जोडीला, प्रवासाची मजा, समारंभाबद्दलचें औत्सुक्य, आणि त्यावेळीं काळा गाऊन आणि चौकोनी टोपी घालून मिरविण्याची मजा, यांच्या मोहाला तो बळी पडल्याशिवाय राहणार नाहीं. ( आणि झालेंहि तसेंच ! )

## मानवी मनाच्या विमोचनासाठीं झगडणारा

नीतीच्या रूढ कल्पनांना धक्का देऊन ज्या धैर्यानें आणि चिकाटीनें जिदनें आपले बंडखोर विचार समाजाच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला, त्याचें फळ आतां दिसूं लागलें आहे. या दृष्टीनें पुढील बातमी फार अर्थपूर्ण वाटते. स्वीडनच्या रॉयल ॲकॅडमीकडून दरवर्षी नोबेल पारितोषिक मिळ-विणाऱ्या व्यक्तींच्या गुणवर्णनपर लेखांचें एक संकलन ‘ अधिकृतरीत्या ’ प्रसिद्ध केलें जातें. १९४७ च्या ग्रंथांतील उतारा खालीलप्रमाणें आहे.

"तरुण मुलांना कुमार्गाला लावून त्यांना बिघडविलें, अशा तऱ्हेचा आरोप जिदवर केला जातो. जिदचा समाजावरील प्रभाव नाकारतां येण्यासारखा नाहीं. परंतु अनेकांच्या मतें त्याचा उपयोग मात्र त्यानें समाजाला अधोगतीला नेण्यासाठीं केला. मानवी मनाच्या विमोचनासाठीं झगडणाऱ्या प्रत्येकावर हाच आरोप प्राचीन कालापासून करण्यांत आला आहे. त्याबद्दल निषेध व्यक्त करून कांहीं विशेष साधूं शकणार नाहीं. त्याऐवजीं याबाबतींत त्याच्या सच्च्या अनुयायांच्या गुणावगुणांची परीक्षा केली तरी पुरे. स्वीडननें केलेल्या त्याच्या या अपूर्व सन्मानास पात्र ठरवितांना, त्याच्या या कार्याचें महत्त्व त्याच्या वाङ्मयकृतीइतकेंच, किंबहुना जास्तीच मानलें गेलें आहे, यांत संशय नाहीं." (नोबेल पारितोषिक विजेते, १९४७. पृ. ९० ).

## शूराचें मृत्यूशय्येवरील मनन

नीसचें रुग्णालय, मे १९४९

"अतिशय साधीं सरळ माणसें किंवा महान् व्यक्ति याच फक्त मरणाच्या आधीन होण्यांतहि आपलें वैशिष्ट्य दाखवितात. इतरांचें मरण सगळ्यांसारखें सामान्य असतें." ज्यां ग्वेहेन्नो. जिद आतां ऐंशीच्यां पुढें आहे. तो इतका अशक्त झाला आहे कीं त्याचा आतां भरंवसा नाहीं. पाणथरीला सूज आली आहे. रक्त दूषित झालें आहे. हें सर्व त्याला माहीत आहे. एकदम केव्हांतरी आपलें हृदय बंद पडेल किंवा खूप वेदना सहन कराव्या लागून कांहीं दिवसांनीं मृत्यू येईल, याची त्याला जाणीव आहे. याबद्दल जर कधीं विचार आलाच तर त्याकडे एक शेवटचा, अतिशय साहसपूर्ण निराळाच अनुभव म्हणून तो बघतो. आणि त्याबद्दलची उत्कंठाच ज़ास्त तीव्र असते. आधीं निद्रानाशाची नेहमीची व्यथा असलेल्या जिदला अंथरुणावर खिळल्यापासून तर आतां झोंप कशी ती माहीतच नाहीं. या परिस्थितींत तो कसे दिवस काढीत असेल त्याचें त्यालाच माहीत. मृत्यूशय्या ठरणाऱ्या या बिछान्यावर सतत टक्क डोळे उघडे ठेवून पहुडलेल्या या वृद्धाचें मन कोणत्या भीतींनीं ग्रासलें जात असेल, असा विचार नेहमीं माझ्या मनांत येतो. परंतु 'कोणत्याच भीतीनें नाहीं,' हें त्याचें उत्तर आहे. मी असा काळजीच्या स्वरांत बोलूं लागलो, कीं त्याला हंसायलाच येतें. "बरोबर आहे, हे असले विचार तुझ्याच मनांत यावयाचे. शक्य तितक्या चांगल्या तऱ्हेनें मी माझें मन गुंतवून ठेवतो. स्वस्थ पडून राहतो, घड्याळाचे ठोके मोजतो, दिवास्वप्नें पाहतो, अजून पाठ येत असलेल्या कवितेच्या ओळी स्वतःशीं म्हणतो. हा असा आहे मी. यांत कौतुक करण्यासारखें कांहीं नाहीं. पुढें आपलें काय होईल हा विचार मला कधींच भेडसावूं शकत नाहीं"

कधीं न संपणाऱ्या अशा या रात्रीच्या एकटेपणांत स्वतःचें काय होईल याचा विचार तो करीत नाहीं. त्याच्या मनांत कांहीं घोळत असलेंच तर आतांपर्यंत निदान पांच-सहा वेळां मनन केलेल्या 'इनिड' मधील एका परिच्छेदासंबंधीचे विचार. आजपर्यंत नजरेंतून सुटलेल्या, व्हर्जिलच्या कांहीं सूक्ष्म हेतूंचें दर्शन आतां आपल्याला घडलें आहे असें त्याला वाटत आहे. 'इनिड' नसेल तर 'काव्ह द्यू व्हातिकान' (Caves du Vatican) चें नाटकांत रूपांतर करण्याबद्दलची कल्पना त्याच्या मनांत घोळत असते. तेंहि नसल्यास आपल्या कोशांतील एखादी नवी कल्पना बाहेर काढून, तिला जिव्हाळ्यानें गोंजारित, ती उमलवित, पुनः लिहिण्याची शक्ति आलीच तर उपयोगांत आणतां यावी म्हणून, तिला रेखीव, निश्चित आकार देण्यांत तो गुंग असतो.

सकाळ झाली कीं, घाईगर्दीनें मी त्याच्या खोलींत जातो. त्याचा ताप उतरला कां नाहीं, रात्रीं आणखी कांहीं त्रास झाला काय, हें समजण्याची



अनुक्रमणिका







मला अतिशय इच्छा असते. पण तो मला कांहीं विचारूं देत नाहीं. त्याला जें मला सांगावयाचें असतें, तें त्याच्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचें असतें. मी फारच जोर केला, नर्सला विचारावयाचा प्रयत्न केला, किंवा त्याच्या तापाचा आलेख पाहूं लागलो, तर त्याला फार राग येतो. तो मला खुणेनें जवळ बोलावितो, मोठयानें बोलून धाप लागूं नये म्हणून अगदीं जवळ बिछान्यावर बसवून घेतो, आणि मग, अगदीं खंगलेल्या आवाजांत, खूप वेळां थांबत थांबत, आदल्या रात्रीं जे विचार त्याच्या मनांत येऊन गेले, त्यांची उजळणी करतो.

" रोजे, तुला कधीं हें जाणवलें होतें ? स्वत:-मधील द्वैतासंबंधीं कित्येक शतकें माणसांच्या मनांत संशय नव्हता. त्यांची खात्री असे कीं, त्यांचें शरीर जरी नाश पावलें, तरी आत्मा अमर आहे. आणि एकाएकीं त्यांची ही श्रद्धा ढासळली. आत्म्याच्या अमरत्वावर त्यांचा पूर्वीसारखा विश्वास राहिला नाहीं. हा बदल केवढा क्रांतिकारक आहे, नाहीं ? "

एके दिवशीं वरिष्ठ धर्मगुरूंच्या (Cardinals) मूर्खपणावर तो फार संतापला होता. आदल्या रात्रीं कार्डिनल मिंडझेंटीच्या ( Mindzenty ) लेखांचें संकलन तो वाचीत होता. तिरस्कार, संताप, चीड त्याच्या स्वरांत पुरेपूर भरली होती. त्या दिवशीचें त्याचें रूप फार उग्र होतें.

" बुडापेस्टमधील त्या अभियोगाच्या करुण हकीगतीनें मला अर्थातच फार धक्का बसला. पण एकदां त्या कार्डिनलचीं हीं प्रवचनें आणि त्यानें लिहिलेलीं उपदेशपर पत्रें वाच तूं तर खरी. किती असंस्कृत, पोरकट, आणि उथळ आहेत तीं ! इतकं गचाळ लिखाण मी जन्मांत वांचलेलें नाहीं. " तापानें फणफणलेला त्याचा चेहरा जास्तीच लाल दिसूं लागला, डोळे रागीट दिसूं लागले. त्याला धाप लागूं लागली. तरीहि त्याचा बोलायचा हट्ट होताच.

" छे, छे, हे धर्मपंथ, आणि हीं पीठें यांनीं फार नुकसान केलें आहे. त्यांच्याकडे दुर्लक्ष्य करणें मला शक्य नाहीं. जीवांत जीव असेपर्यंत मीं त्यांच्याशीं झुंजत राहणार. या धर्मगुरूंना त्यांच्या आसनांवरून खालीं खेंचलेंच पाहिजे. त्यांना नेस्तनाबूद करून त्यांच्या या घातकी मुरळींतून मानवाची मुक्तता केलीच पाहिजे. तूं फार चालवून घेतोस, रोजे. अन्याय मुकाटयानें सहन करण्यानें आपण शत्रूचे हात बळकट करीत असतो. जर लढतां येत नसेल तर सरळ पराभव कबूल करावा. मी मात्र पराभव कधींच कबूल करणार नाहीं. माझ्यांत धुगधुगी असेपर्यंत मी झुंजत राहीन. धर्मपीठांपुढें मान कधीहि तुकविणार नाहीं. "

जिदला कालची रात्र फार वाईट गेली. आज सकाळीं स्वत:बद्दलच हळहळत होता. असें फार क्वचित् घडतें. आपला दुबळेपणा, आपल्या वेदना, अनेक सुया खुपसलेलें आपलें वृद्ध जर्जर शरीर, यांची त्यानें हंसतमुखानें माझ्यापुढें यादी वाचली.

"या अशावेळीं" मी त्याला म्हटलें, " स्वत:च्या आत्म्याच्या अमरत्वाचा विचार फार दिलासा देत असेल, नाहीं ? "

तो हंसून म्हणाला, " छे, छे, बिलकूल नाहीं. त्या बाबतींत वृद्धत्व, आजार, मृत्यूचें समीप येणें याचा कसलाच परिणाम माझ्यावर होत नाहीं. मृत्यूनंतर शिल्लक उरण्याची कल्पना मला शिवतच नाहीं. उलट जितका मी पुढें जात आहे, तितकी पैलतीराची कल्पना मला जास्तच पटेनाशी होत आहे. " थोडा वेळ थांबून पुढें तो म्हणाला, " असें म्हणतांना श्रद्धावान माणसापेक्षांहि मी जास्त सच्चा आध्यात्मिकवादी असतो... या कल्पनेवर मी बराच विचार केला आहे. थोडी संधी मिळाली तर विस्तारानें ती मांडण्याचा माझा विचार आहे थोडी उसंत मिळायला पाहिजे ...... "

(हें बोलत असतांना त्याच्या चेहऱ्यावर प्रसन्न हास्य उमललें होतें. आदल्याच दिवशीं, येथून फक्त एक मैलावर, मॉरिस मॅटरलिंक कालवश झाल्याची बातमी आली होती. त्याचे शेवटले शब्द " अमरत्व चिरायू होवो " असे होते !)

मृत्यूबद्दल बिनतक्रार

पॅरिस, सोमवार १९ फेब्रु. १९५१

रात्रीचे दहा वाजून वीस मिनिटें झालीं होतीं. कालपासून त्यानें डोळे उघडलेले नाहींत.

दुःख नाहीं पण एक प्रकारची विषण्णता मात्र वाटते. त्याचा अंत अतिशय शांतपणें झाला. मृत्यूला सामोरें कसें जावें हें त्यानें चांगलें जाणलें होतें. त्याची अलिप्त वृत्ति, निसर्गाच्या नियमांपुढें विना तक्रार मान तुकविण्याची त्याची तयारी– या फार अनुकरणीय वाटतात.

---












श्री. शं. बा. जोशी

# नार : पाणी ? – ( नारायण– विष्णु हृदय. )

## नार : आप

' नार ' याचा अर्थ जाणण्याच्या प्रयत्नांत नारायण – विष्णु तत्त्व व परंपरा या विषयीं बरीच माहिती उपलब्ध होत आहे, असें वाटलें. तसेंच, मुळांत शैव व वैष्णव पंथांचा उगम एकाच ठिकाणीं झाला असावा असें दिसूं लागलें. यांतील कांहीं भाग सूज्ञांपुढें विचाराकरितां मांडीत आहे.

नार म्हणजे पाणी, असा पूर्वपरंपरागत अर्थ आहे.

नराणामयनं ख्यातमहमेकः सनातनः ॥
आपोनारा इति प्रोक्ता आपोवै नरसूनवः ।
अयनं मम ताः पूर्वमतो नारायणोऽस्म्यहम् ॥
—महाभा. शां. ३५०, ३९–४०.

स्वतः भगवान् नारायणानें आपल्या नांवांची फोड करून असें सांगितल्याचें महाभारतांत नमूद आहे. नारायणीय तत्त्व विशद करण्याकरितांच व्यासांनीं महाभारत रचिलें, असें समजलें जातें. " नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् " असा, नारायण-स्मरणपूर्वक महाभारत कथेस प्रारंभ होतो.

' नार ' चा आप हा अर्थ व्यासांना मान्य आहे. हा प्राचीन अर्थ मनूसहि संमत असल्याचें दिसतें ( १.१० ). पण ' नार : आपः ' हें केवळ पाणीच असेल काय, अशी बळकट शंका डोकावते !

## नार : जगदादि तत्त्व

नारायणत्व पावणें, हें नराचें साध्य आहे. [ नारायणम् अयनम् ]. नर हा आपल्या प्रयत्नानें नारायण होऊं शकतो, अशी एक हिंदी म्हण आहे. " एकाच सत्त्वाचे दोन भाग होऊन नर व नारायण झाले " असें महाभारत सांगतें. " नार " म्हणजे विश्वाचें मूल तत्त्व; त्या मूल तत्त्वाचा अंश मानवांतहि आहे. म्हणूनच याला नर [ < नार ] हें नांव प्राप्त झालें आहे. आपल्या मूल स्वरूपाप्रत जाणें —स्वस्वरूपी होणें हेंच नराचें साध्य ठरतें.

" तत् जलानिति [ सर्वं खलु इदं ब्रह्म ] " [ छांदोग्य उप. ३–१४–१ ]. ' जल ' हेंच विश्वाचें मूलतत्त्व होय, असें उपनिषदें प्रतिपादन करतात. म्हणून नारायणांतील नारचा अर्थ आप किंवा जल घेण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. " तत् जलानिति " या वाक्यावर वैष्णव संप्रदायानुसार भाष्य करते वेळीं मध्वाचार्यांनीं ' जला'चा नारायण असाच अर्थ सांगितला आहे. "आपो वा इदमग्र आसीत्", " आप एव इदं अग्र आसुः ", " आपो वा इदं सर्वं ", " विश्वाभूतान्यप ! " ...... इत्यादि श्रुतिवचनें नर = अप या अर्थास पुष्टी देत आहेत.

## अमृताहि आप:

आप ( जल ) हें अमृत; तर नारहि पण अमृत असलेंच पाहिजे. नारायण जर अमृत–निधान, तर नरांतहि हा अमृतांश आहे हें सिद्ध झालेंच. " हे अमृतस्य पुत्राः " असें संबोधिलें आहे तें याच कारणाकरितां होय. ' अमृतत्त्वाय जीवसे ' असें वेद सांगतो.

सोमरस ' अमृत ' म्हणून गणला गेला; त्याचप्रमाणें नार : आपहि अमृत म्हणून मानलें असण्याची शक्यता आहे. सोम, एक वनस्पति आहे, याविषयीं शंकेस जागा नाहीं. या सोमाचें वर्णन ऋग्वेदांत येतें. यज्ञ यागांतून सोमवल्लीचा रस काढून पिण्याची प्रथा होती. या रसाचें उदात्तीकरण होऊन तेंच अमृत बनलें. " सोम, प्रथम ' द्यु ' लोकांत होता, पुढें तो



अनुक्रमणिका






भूमीवर आला. " [ ९. ६१. १० ] ' दिवः पुत्रः – दिवः शिशुः ' असें त्याचें वर्णन होऊं लागलें. विद्यानिधी श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव म्हणतात कीं, " वास्तविक सोमाचा द्यु लोकांशीं संबंध लाक्षणिक असला पाहिजे. सध्यांहि कोणत्याहि चांगल्या गोष्टीचा संबंध स्वर्गाकडे लावण्याची पद्धत आहे; याचाच हा प्राचीन नमुना आहे असें दिसतें. [ ऋग्वेदाचें भाषांतर, नवम मंडळ–परिचय, पा. ४ ] श्री. चित्रावशास्त्री यांच्या या विधानांना वैदिक वाङ्मयांत भरपूर पुरावा आहे. पण ' नार'चें मूल स्वरूप मात्र गूढच आहे. नारायण हें नांव ऋग्वेदाइतकें प्राचीन आहे. त्या काळीं नार शब्द प्रचारांत होता हें निश्चित. पण नारच्या रहस्यांवर प्रकाश पाडणारे उल्लेख मात्र आढळत नाहींत. जल या अर्थी, आप सारखे दुसरे शब्दच मात्र जागोजाग दृष्टीस पडतात. नारचें कोडें उलगडेल तर, आपल्या प्राचीन धार्मिक व सामाजिक चालींच्या प्राथमिक स्वरूपाचा बराचसा भाग उजेडांत येईल असें वाटतें.

### नार : रस

' आपोवै मधु ', ' आपोहि पयः ' या प्रकारचे उल्लेखहि आहेत. म्हणून नार किंवा आप हें केवळ पाणी, असें मानणें चुकीचें होणार आहे. हा रस (द्रव) असावा असें वाटतें. या **आप–रसाची** चव मधुर असावी; कारण याला मधु म्हटलेलें आहे. सुधा (अमृत) हि मधुर असल्याचीं वर्णनें आहेत; म्हणून 'आपोहि पयः' असें म्हटलें असलें तरी हा रस दुधासारखा असावा एवढाच याचा अर्थ दिसतो. हा नार : रस दुधासारखा पौष्टिक, वीर्यवर्धक असावा. तसेंच याचा रंग दुधाप्रमाणें पांढरा असावा असें वाटतें.

### जल व विष्णु

नारायण आणि विष्णु हे निराळे नव्हेत. एकाच देवतेचीं दोन नांवें, अशी एक श्रद्धा आहे. यांत कितीसें तथ्य आहे, हें तपासून पाहणें जरूर वाटतें. ऋग्वेदांत येणारें नारायण हें नांव एका व्यक्तीचें आहे. देवता-स्वरूपांत नारायण हा प्रथम महाभारतांतच दृष्टीस पडतो. पण विष्णु या दैवताचें वर्णन ऋग्वेदांतच येतें. म्हणून विष्णु आणि नारायण म्हणजे एकाच देवतेचीं दोन नांवें असें मानण्यास बाध येत आहे. तरी पण या दोन्हीं नांवांतून अभिप्रेत असलेला देव एकच होय अशी निष्ठा असण्याचें कारण काय असेल ? हा संबंध निष्कारण अर्थविहीन आहे असें म्हणण्यास पुढील गोष्टी आड येत आहेतः

विष्णु जलशायी आहे, अशी भावना आहे. विष्णु-सहस्रनामांत ' अपांनिधिः ', ' अंभोनिधिः ', ' वरुणः ', ' क ' इत्यादि जलवाचक अनेक पर्याय नांवें येतात. या यादींत ' कुवलेशयः ' असेंहि एक नांव आहे, ' कुवलं जलं; तस्मिन् शेते इति ' असें आचार्यांचें यावर भाष्य आहे.

गंगा नदी, विष्णुपदीं उगम पावली, अशी पुराणकथा आहे. विष्णु म्हणजे जलनिधि, या श्रद्धेच्या पार्श्वभूमीशिवाय गंगाः ' विष्णुपादाब्जसंभूता ' या कथेंत कांहीं रसच राहणार नाहीं '.

यादवकृष्ण हा विष्णूचा अवतार असें मानण्यांत येतें. अवतार म्हणून मान्य नसलें तरी, हा कृष्ण, विष्णु-परंपरेचा पुरस्कर्ता होता ही गोष्ट कोणीहि नाकबूल केलेली नाहीं. कृष्णानें " सरसां अस्मि सागरः " असें सांगितलेलें गीतेंत नमूद आहे. ही सांप्रदायिक निष्ठा, विष्णु व जल यांतील घनिष्ठ संबंध सिद्ध करीत आहे, आणि हा संप्रदाय गीतेहूनहि प्राचीन असला पाहिजे. महाभारत काळीं हा संप्रदाय सुप्रतिष्ठित झाला असला पाहिजे.

जगदारंभीं विष्णु, सागरांत एका वटपत्रावर बालरूपानें तरंगत होता, अशी पुराणकथा आहे. सामान्य खेडुतांपर्यंतहि श्रेष्ठ तात्त्विक विचारांचें– तत्त्वज्ञानाचें लेण पोंचविण्याकरितां पुराणें निघालीं. त्यांतील प्रतीकात्मक सांकेतिक परिभाषेचा विसर

पडला ही गोष्ट निराळी. "तज्जलानिति" या औपनिषदिक अमूर्त तात्त्विक विचाराला, मूर्त स्वरूप देण्याकरितां ही कथा निर्माण झालेली दिसते. विष्णूचे मत्स्य, कूर्म हे प्राथमिक प्रादुर्भाव, जलाची स्मृतीच जागृत करीत नाहीत काय ?

विष्णूच्या मूर्ति-चित्रणांत वरील सांप्रदायिक श्रद्धेला पुष्टी देणारीं सांकेतिक प्रतीकें आढळतात. विष्णूच्या हातांतील शंख व पद्म, हीं कशाचीं प्रतीकें ? 'त्वं पुरा सागरोत्पन्नः, विष्णुना विधृतः करे' असें शंखाचें वर्णन केलें जातें. पद्म म्हणजे कमळ. हें पाण्याचें आणखी एक प्रतीक आहे. 'पद्मे शय' असें विष्णूचें वर्णन महाभारत व हरिवंशांत येतें. या ठिकाणीं पद्म म्हणजे पाणी हा अर्थ घ्यावा लागतो. कारण विष्णु, सागरांत शयन करणारा असें सांगण्यांत येतें. पण कमळावर निजलेला असें दाखविणारें चित्र किंवा कथा मिळत नाहीं. संस्कृतमध्यें कमळ या शब्दाचा पाणी असाहि एक अर्थ आढळतो. विष्णूला पद्मनाभ असेंहि नांव आहे. नाभि म्हणजे केंद्र. केंद्र या अर्थीं नाभीचा उपयोग उपनिषत् कालापासून आढळतो. पाण्याचें केंद्र म्हणजे काय ? सागरच ना ?

**केशवः नारायणः माधव.**

आचमनाचा प्रारंभ या नांवांपासून होतो. यांतील प्रत्येक नांव घेऊन, पाणी प्राशन करावयाचें असतें. त्रिकाल संध्या, म्हणजे प्रत्येक दिवशीं तीन वेळां तरी आचमनांत हीं नांवें यावयाचींच. संध्या-वंदनास आदर्श स्थळ म्हणजे जलाशयाचें तीर. कोणत्याहि क्रियाकर्मास – कार्यास आचमनापासूनच प्रारंभ होतो. आचमनांत बहुतकरून विष्णूचीं केशव नारायणादि चोवीस नांवें घेण्यांत येतात. त्या प्रत्येक नांवांत विष्णूच्या निरनिराळ्या स्वरूपाची स्मृति सांठविलेली आहे. त्याचें स्मरण करते वेळीं पहिलीं तीनहि नांवें जवळ जवळ एकाच अर्थाचीं (रस-वाचक) असण्याचें कारण काय ?

'नारायण' हें जलवाचक नांव असल्याचें विवरण आलेंच आहे. माधव हें नांव मधुवाचक आहे. 'केशव' सुद्धां याच वर्गांतलें असावें अशी शंका येते. 'केशव' यांतहि जलवाचक अर्थ अभिप्रेत नसतां तर, 'केशवं पतितं दृष्ट्वा पांडवाः हर्ष-निर्भराः," हें विरोधाभासात्मक सुभाषित, प्रसिद्धीस आलेंच नसतें. 'नारायण' आणि 'माधव' या नांवांप्रमाणें 'केशव' या नांवांतहि रस (जल) वाचक अर्थ घेण्यांतच औचित्य राहणार आहे. कारण विष्णुस्मरणाबरोबर किंचित् पाणी घेऊन रसरूपी विष्णूचें हें प्रतीक अंतरंगीं सांठवावयाच्या प्रयत्नांतील ही एक कृती आहे. म्हणून आचमनांतील पहिलें 'केशव' हें नांवहि जलवाचक असलें पाहिजे असें वाटतें. हें खरें नाहीं असें म्हटलें तरी पुढील विवेचनास बाध येत नाहीं.

संध्यावंदनांत व विष्णुसहस्रनामांत या देवाच्या विविध स्वरूपाचीं नांवें येतात, पण त्यांत जल (रस)– वाचकच विशेष असण्याचें कारण काय ? भगवद्गीतेंत विविध विभूति–स्वरूपांचे उल्लेख आहेत, त्यांतहि हाच प्रकार दिसतो. "स्रोतसाम् अस्मि जाह्नवी', 'सरसां अस्मि सागरः', 'वरुणो यादसाम् अहम्'; 'रसोऽहं अप्सु', 'जीवनं सर्व भूतेषु' या नांवांशिवाय जलाशयाशीं संबंध असणाऱ्या नागाचा व सुसरीचा उल्लेखहि पण विचारार्ह वाटतो.

विष्णूचें विश्वव्यापक स्वरूप दाखविण्याकरितां निर्माण झालेल्या हजारों नांवांत, रसवाचकच विशेष असण्यांत, कांहींच उद्देश नसेल काय ? 'रसोवै सः' या मूलस्वरूपी रसाचें सम्यक् दर्शन घडविण्याकरितां, वेगवेगळ्या स्वरूपांत हीं रसवाचक नांवें पुनः पुनः सांगितलीं असण्याची शक्यता नाहीं काय ?










## मधु व विष्णु

सहस्रनामावलींत 'मधु' व 'माधव' हीं पर्याय नांवें येतात. यांतील 'मधु' हें नांव रसवाचक आहे, हें उघड आहे. यादव कृष्णालाहि हीं नांवें होतीं असें महाभारतावरून कळतें. गीतेंत "ऋतूनां कुसुमाकरः' असें वर्णन येतें. यावरून विष्णुपरंपरेंत मधु-रसाला निश्चित स्थान असल्याचें प्रत्ययास येतें

विष्णु व मधु यांमधील साहचर्य ऋग्वेद काळा-इतकें प्राचीन आहे. नारायणाचा व विष्णूचा निकट संबंध दाखविणारी ही बाब फार महत्त्वाची आहे; आणि पुरातन आहे. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलांतील सुप्रसिद्ध विष्णुसूक्तांत मधु व विष्णु यांतील निकट संबंध वर्णिला आहे.

यस्य त्रिपूर्णा मधुना पदान्यक्षीयमाणा
स्वधया मदंति ।
त्रिधातु पृथिवीमुत द्यामेको दाधार
भुवनानि विश्वा ॥ १-१५४-४ ॥

विष्णुपदीं मधु स्रवत आहे. त्याचीं तीन पाउलें मधुयुक्त आहेत. तीं पाउलें अक्षय्य अन्नानें, लोकानां उत्साहित करतात. [ मदयंति=मादयंति ]. तो विष्णु ( या प्रकारें ) अखिल विश्वाचें धारण करितो.

–पुढील ऋचेंत हा विचार याहूनहि स्पष्ट आहे :
उरु क्रमस्य विष्णोः पदे परमे मध्व उत्सः॥५॥

अत्यंत आक्रमणशील – विश्वव्यापी विष्णूच्या परम पदीं मधूचा झरा आहे.

### त्रिपथगा : गंगा

विष्णुपदीं गंगा उगम पावते; विष्णूच्या परम पदांत मधूचा झरा आहे. या दोन भावनानां जन्म देणारी श्रद्धा एकच आहे, हें येथें उघड होत आहे. पुराणांतील कथानां वेदांतून अशा रीतीनें कांहीं आधार असलेले प्रत्ययास येतें. गंगा (पाणी) व मधु हीं एकाच मूल वस्तूचीं दोन निराळीं नांवें आहेत, हें या ठिकाणींहि सिद्ध होत आहे. ऋग्वेदांत विष्णुपदीं मधु आहे, असें वर्णन येतें. हीच गोष्ट पुराणांत विष्णुपदीं गंगेचा उगम होतो. अशी आलेली आहे. म्हणून 'विष्णु ( आप : मधु ) व नारायण ( नार : अप : मधु ) हे अभिन्न होत या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें म्हणणें धाडसाचें वाटतें. विष्णूच्या तीन पाऊलांचा महिमा सुविख्यात आहे. ऋग्वेदांत याचें वर्णन येतें. या 'त्रीणि पदानि' चा व पुराणकथेंतील त्रिपथगा गंगेचा संबंध मोठा हृद्य वाटतो.

"गंगाजल लव कणिका' जरी पोटांत गेली, तरी तो देह पवित्र होतो ही श्रद्धा; गंगाजल हें 'विष्णु पादोदक', 'तीर्थ', अशी भावना आहे. तीर्‌थ म्हणजे पैलतीराला नेणारें, परमपदीं पोहोंचविणारें; परमपदींचें शांति सुख देणारें जल, तें–तीर्थ होय. "तत् जलानिति शांत उपासीत" या औपनिषदिक विचाराला आचाराचें व्यावहारिक स्वरूप देण्याचा या 'तीर्थ'–प्राशनांतील उद्देश दिसतो. "गंगा गंगेति यो ब्रयात्...... विष्णु लोकं स गच्छति" हा नित्य पूजेंतला मंत्र, गंगा व विष्णूचा संबंध पुनः दृढ करीत आहे. या रीतीनें आपः मधु यांचा, नारायणाप्रमाणें विष्णुशीहि अभेद संबंध असल्याचें दिसून येत आहे.

### नारायण = विष्णु

विष्णूचा अवतार–किंवा विष्णु परंपरेचा अध्वर्यु यादव कृष्ण याच्या चरित्रांतहि या विचाराला पुष्टी मिळते. कृष्णानें गीतेच्या द्वारें नारायणीय धर्माचें प्रतिपादन केलें आहे, असें मानण्यांत येतें. 'मला सर्व अर्पण कर', 'सर्व समर्पण भावनेनें कार्य करीत रहा' असा गीतेचा संदेश आहे. नारायणीय धर्मांतील 'एकांत' विचाराशीं हें संपूर्ण सुसंगत आहे. श्रेष्ठ विष्णु-भक्त म्हणून प्रसिद्ध असलेला नारद हा नारायण संप्रदायाचा प्रणेता होय. नारायण संप्रदायाचा प्रवर्तक 'नार'द असें सांगण्यांत कांहीं उद्देश दिसून येतो. नारायणांतील 'नार' तत्त्वाचें ज्ञान करून देणाऱ्याला 'नार'द म्हणण्यांत औचित्य दिसून येतें.









जसें विष्णु व गंगा ( जल ) यांतील निकट संबंधाविषयीं शंका घेण्यास जागा नाहीं, त्याप्रमाणें विष्णु व नारायण [ नार=आप : मधु ] यांच्यांत विसंगति आहे असें म्हणतां येणार नाहीं.

पण विष्णु संपूर्णतया ' नार ' ( अयन ) आहे, असें म्हणावयास थोडी अडचण आहे. कारण ऋग्वेदांतील विष्णूचीं वर्णनें सूर्याशीं जुळतात. तेज, शौर्य, वीर्य सूचक तीं वर्णनें आहेत. म्हणून विष्णु व नारायण हे एक नव्हेत असें वाटणें साहजिक आहे. प्रो. एस्. के. दे यांसारख्या विद्वानांना विष्णु व नारायण यांचा ' बादरायण ' संबंध वाटतो. व्यासानीं वेदांतील अनेक गोष्टी भारतांत बेमालूमपणें गोविल्या आहेत. ऋग्वेदांतील यदु-तुर्ववंशाची कथा महाभारतांत येते. इंद्रानें वृत्रासुराचा संहार केला, कृष्णानें कालियामर्दन केलें. इंद्रानें नार-मर नामक दैत्याला मारलें, तर कृष्णानें नरकासुराचा वध केला. अशा प्रकारांस बादरायण संबंध म्हणावयास जागा आहे. पण यांतहि कांहीं एक कारण आहे असें दिसतें. इंद्र व विष्णु यांचें ऐक्य होऊन त्यांचें एक जोड दैवत ऋग्वेद काळींच बनलें आहे. कृष्ण हा विष्णूचा अवतार म्हणून दाखवितांना इंन्द्रा-विष्णूंच्या संगमामुळें इंद्राच्या कथा, कृष्णास जोडल्या आहेत असें दिसतें. व्यासांना, ' वेदव्यास ' असें संबोधण्यांत येतें. पुराणेतिहासाच्या परंपरा चांगल्या जाणणारे व त्या परंपरा सुंदर रीतीनें महाभारतांत गुंफणारे व्यास, विष्णु व नारायण निराळे नव्हेत असें प्रतिपादन करीत आहेत. यांत कांहींच तथ्य नाहीं असें म्हणतां येईल काय ? नारायण संप्रदाय ऋग्वेदाइतका तर प्राचीन आहेच. कारण, ऋग्वेदांतील नारायण ऋषीचें नांव, ' नार ' संप्रदायाच्या अस्तित्वाचें सूचक आहे. नार संप्रदायांतील मधूचा विचार घेऊन, त्यालाच कांहीं कलाटणी देऊन, वेदांतील विष्णु बनलेला दिसतो. नार संप्रदायांतील कांहीं गोष्टी ऋषींना मान्य नसाव्या. नारायणीय मार्गांतील भक्तिपंथ आजहि बुद्धिवाद्यांच्या व वैदिक परंपरेंतील विद्वानांच्या टीकेचा विषय झालेला आहे. यावरून अतिप्राचीन काळीं तर या भक्तिमार्गाच्या प्राथमिक स्वरूपांतील गोष्टी वैदिक ऋषींना स्वीकारार्ह वाटल्या नसल्यास नवल नाहीं. ' धियो योनः प्रचोदयात् ', ' धनकनकसंपत्ति, संतति, कीर्ति दे ' – अशी प्रार्थना करणारे वैदिक ऋषी; तर नारायणपंथांत सर्वसंगपरित्यागाकडे, सर्व नको म्हणण्याकडे प्रवृत्ती. तरीपण त्या नार पंथांतील कांहीं चांगल्या गोष्टी स्वीकाराव्या लागल्या असणें शक्य आहे. म्हणून सूर्य व मधु यांचा संगम विष्णूंत झालेला दिसतो. ऋग्वेद काळींच संस्कृति-संगमास प्रारंभ झालेला आहे असें बऱ्याच संशोधकांचें मत आहे.

' नार ' चा ' आप ' हा अर्थ प्रा. दे. * यांना मान्य नाहीं पण त्याचीं कारणें त्यांनीं दिलीं नाहींत. मोनियर विलियम्स् हे आपल्या महाकोषांत नारचा ' आप ' हा अर्थ सांगतात. पण Invented to explain Narayana असा शेरा देतात. प्रा. दे. व मो. विलियम्स् यांसारख्या संस्कृत भाषाकोविदानां नार हा शब्द उपरा आहे; आर्य भाषावर्गांतला नव्हे असें वाटणें साहजिक आहे. नार हा शब्द देशी आहे. ( ' मऱ्हाटी नार ' सत्यकथा, ऑक्टोबर १९५७ अंक पहा ). नारायणीय संप्रदाय वैदिक परंपरेतला नव्हे, असें कु. मृणाल दासगुप्त. व प्रा. दे. यांनींच आपल्या प्रबंधांत सविस्तरपणें विवरण केलें आहे. डॉ. राधाकृष्णन् यांनीं ' भारतीय तत्त्वज्ञान ' या ग्रंथांत पंचरात्र : नारायणीय संप्रदाय हा आर्येतर जनांचा आहे, असें आपलें मत दिलें आहे. ( भाग १ ). डॉ. सुरेंद्रनाथ दासगुप्त यांनीं लिहिलेल्या " भारतीय तत्त्वज्ञानाचा

---

* Early Vishnum and Narayaniya Worship, Indian Historical Quarterly VII, 1931 कुमारी मृणाल दासगुप्ता यांचा लेख व प्रा. दे. यांच्या तळटीपा पाहा.



अनुक्रमणिका








इतिहास " या बहुमोल ग्रंथांत नारायण संप्रदाय : पंचरात्रागम यांतील विचार, वैदिक पंथांहून निराळे आहेत. असें अनेक दुर्मिळ ग्रंथांतील उतारे देऊन साधार दाखविलेले आहेत. [ भाग III ]. अशा प्रकारें नारायणीय पंथच जर आर्येतरांचा, तर 'नार' हें सुद्धा आर्य भाषावर्गांतलें नसावें हें उघड आहे. नार हा शब्द नारायणाइतका प्राचीन आहे. नार या शब्दाला असलेला आप हा अर्थहि अमान्य करतां येत नाहीं. पुराणांतरीची अशी एक कथा आहे कीं, नारायण ऋषीची तपश्चर्या पाहून इंद्राला भीति वाटली; आणि त्याचा तपोभंग करण्याकरितां त्याच्याकडे कांहीं सुंदर स्त्रियांना पाठविलें. नारायणानेंहि एक '**नार**' निर्माण केली. तिचें सौंदर्य पाहून इंद्रांगना लज्जित झाल्या ! आणि ही ' नार ' कोण तर अप्सरा – उर्वशी ! नार म्हणजे लावण्ययुक्त ललना. मऱ्हाटींत नार शब्द आजहि या अर्थी प्रचारांत आहे. '**अप्सरा**' हा संस्कृत शब्द झाला. **नारां** ( यणां ) त निर्माण केलेली स्त्री ' नार ' च असली पाहिजे हें उघड आहे. अप्सरा यांत नारचा ( आप ) अर्थच अभिप्रेत नाहीं काय ? तरी पण नारच्या ऐवजीं अप् हा शब्दच वेदांत सर्वत्र येतो. कांहीं व्यक्तिनामांत ' नार ' डोकावतोच ! कारण प्रसिद्ध व्यक्तींचा उल्लेख अनिवार्य आहे ! नार शब्द न वापरण्याचें कारण काय असावें ? नार हा शब्द गीर्वाण वाणींतला नव्हे म्हणून तर नसेल ना ?

## नार पंथ व ऋग्वेद

इंद्रानें ' नारा 'यणाच्या तपश्चर्येचा भंग करण्याचा प्रयत्न केला, यावरून इंद्रास 'नार' ण पंथ मान्य नव्हता हें ध्वनित होत आहे, 'नारण' संप्रदाय हा अवैदिक असल्याचें आधुनिक संशोधकांनीं उघड केलेंच आहे. यावरून नार संप्रदायाला इंद्राचा विरोध होता, ही गोष्ट जवळ जवळ निश्चित ठरत आहे. तरीपण नार संप्रदायांतील मधूच्या विचाराला ऋग्वेदांत प्रवेश मिळालाच आहे. नारचा स्पष्ट उल्लेख नसला तरी, 'आप'ची वाढती प्रतिष्ठा तेथें दृष्टीस पडते. यांत ऋग्वेदकालीन दोन भिन्न संप्रदायांच्या समन्वयाचा पडसाद ऐकूं येतो. दोन भिन्न विचार-प्रणालींच्या संघर्षांत, सामाजिक घडी विस्कटूं लागते. अशा परिस्थितींत समाज–धारणेच्या दृष्टीनें कांहीं एक प्रकारें समन्वय घडवून आणणें अनिवार्य होतें. सांस्कृतिक संगमास मान्यता मिळूं लागते; पण यांतील पक्षाभिमानाची तीव्रता प्रथम कमी झालेली दिसली, तरी पुढें कारणांतरानें, मतभेद डोकावतात. त्यांतील प्रबल पक्षाचें प्रस्थ वाढत जाऊन पुढें तो समन्वय, नांवापुरता राहतो. ऋग्वेदांत विष्णु, सूर्यासारखा तळपणारा दिसतो. तो आदित्यापैकीं एक आहे, असें वाटतें. ऋग्वेदांतील विष्णु सूक्तांतच विष्णूच्या ठिकाणीं मधूचा झरा असल्याचें वर्णिलेलें आहे. आणि त्याच सूक्तांत मधू ( विष्णू ) चें वर्चस्व वृद्धिंगत होऊं लागल्याचा पुरावा आहे. " विष्णोर्नु कं वीर्याणि प्रवोचं " [ विष्णूचे पराक्रम मी गातो ] असा या सूक्तास प्रारंभ होतो. विष्णूचें स्थान हें 'परम पद', असें तेथें सूचित केलें आहे. आपल्या तीन पाउलांनीं हा मधु ( विष्णु ) सर्व विश्वाला व्यापून टाकतो, अशी स्तुति ऐकावयास मिळते; तरीपण ऋग्वेदांतील अग्रणी वीर इंद्र, असेंच समजलें जातें.' विष्णु हा ' उपेंद्र ' असें परंपरा सांगते. पण प्रत्यक्षांत उपेंद्रानें इंद्राची जागा आक्रमिलेली दिसते ! इंद्रपद म्हणजे श्रेष्ठ स्थान; पण त्या 'परमपदीं' विष्णु आहे ! देवेंद्रत्व तर नष्ट झालेंच; शिवाय नरेंद्रत्वांतहि विष्णूचा अंश असल्याचें, 'ना विष्णुः पृथ्वी पतिः' हें वाक्य जाहीर करीत आहे ! ऋग्वेदांत विष्णु म्हणजे आदित्य वाटतो. पण गीतेंत विष्णुच आदित्य बनतो ! 'वेदविद्या त्रिगुणात्मक संसारांत गुरफटविते ' [ त्रैगुण्यविषया वेदाः ] असें गीता सांगते !

ऋग्वेदांत 'अग्निमीळे 'ला सर्वप्रथम स्थान दिलें आहे खरें; पण आप व अग्नीचें सख्य वाढत चाललेलें ऋग्वेदांतच दृष्टीस पडतें. ' अग्नेनय सुपथा राये अस्मान् ' याचप्रमाणें ' पयस्वानग्न



अनुक्रमणिका







आगहि, तं मा संसृज वर्चसा, ' असें आप व अग्नि या दोघांना मिळून येण्यास आमंत्रण देण्यांत येऊं लागलें. परम ' पावक ' म्हणून नांवाजलेल्या ' जातवेद् ' अग्नीची जागा आपनें व्यापलेली पहावयास मिळते. 'आपो हि ष्ठा मयो भुवः' या सूक्तांत अन्न व ज्ञान देण्यास आणि सर्व पापांचा नाश करण्यास ' आप 'ला प्रार्थिलें आहे. ( विष्णु व आप —मधूचा अविभाज्य संबंध वर दाखविला आहे. ) अशा प्रकारें आप : मधूंत क्रमानें इंद्राग्नि विलीन होत गेलेले पुढील काळांतील घटनांवरून सिद्ध झालेलें आहे. हें आप : मधूचें आक्रमण म्हणजे नारपंथाचा वरचष्माच नव्हे काय ?

ऋग्वेदांत आदित्य व विष्णूचें साहचर्य आहे. त्या जागीं आज ' सूर्य—नारायण ' आलेला दिसत आहे. अग्नीहि 'नारायण' झाला ! यज्ञ थंड पडला ! नारायणाच्या प्रेरणेनें वैदिक यज्ञांच्या ऐवजीं ' नाम ' यज्ञ प्रचारांत आला ! नांवांचा यज्ञ राहिला ! याप्रमाणें विष्णु आणि नारायणाच्या संप्रदायाकडून घडलेल्या कार्यावरूनहि या दोन्ही देवता, मूल स्वरूपांत एकच असाव्यात हें सिद्ध होत आहे.

सर्वव्यापी शक्ति : विष्णु; मधु व विष्णु यांतील निकट संबंध लक्षांत घेतां; विष्णुबरोबर मधुहि विश्वव्यापी ठरतो. विष्णूनें हें विश्व निर्माण केलें, असें त्याच्या स्तुति—सूक्तांत सांगितलेलें आहे. यावरून पर्यायानें मधु : आप हें तत्त्व, जगदादि कारण आहे, असें सांगितल्याप्रमाणेंच होत आहे. भाषेंत थोडा फरक आहे एवढेंच. मधूच्या ऐवजीं विष्णु प्रतिमा वापरलेली आहे. ' मधु वाता ऋतायते... ' ' हें सर्व विश्व मधुमय आहे ' असें नारायणोपनिषद् सांगतें. ' सर्वं विष्णुमयं जगत् ' याचेंच हें विवरण आहे.

' मधु विद्येचें ' नांव ऋग्वेदांतच येतें. ही मधुविद्या दध्यंकाला माहीत होती. पण इंद्रानें ही विद्या कोणासहि न सांगण्याची आज्ञा केली होती. कारण, त्यामुळें आपल्या इंद्रपदास धोका आहे असें त्याला वाटत होतें. तरीपण दध्यंकाकडून अश्विनीदेवांना मधुविद्या समजलीच ! याकरितां दध्यंकाचा इंद्रानें शिरच्छेदहि केला, अशी कथा आहे. यावरूनहि ' मधु ' संप्रदाय इंद्रपंथाचा विरोधी होता, असें दिसून येतें. बृहदारण्यकोपनिषदांत दध्यंक प्रणीत मधुविद्येचें विवरण येतें. [ २. ५. २२ ] ' सर्वाणि भूतानि', 'सर्वे देवाः', 'सर्वे लोकाः' 'सर्वे प्राणाः' ( हे सर्व ) मधु आहे. मधूच विश्वोत्पत्ती—कारण वस्तु आहे, असें प्रतिपादन करणाऱ्या या ' मधुविद्येंत ' आणि वरील विष्णु—मधु विवरणांत कांहीं मूलभूत फरक आहे असें म्हणतां येईल काय ?

मधुविद्येचे ओझरते उल्लेख ऋग्वेदांत येतात. पण ' मधु ' ही काय चीज आहे, हें कळण्यास मार्ग नाहीं. मधु कसा तयार होतो, किंवा तयार करावयाचा, याबद्दल कोठें कांहींच माहिती मिळत नाहीं. सोमरस कसा तयार करावयाचा याचें विवरण वैदिक वाङ्मयांत आहे. मधूचें रहस्य मात्र कळत नाहीं. ऋग्वेदाच्या भाषांतर प्रसंगीं विद्यानिधी श्री. चित्रावशास्त्री यांनीं हा प्रश्न उपस्थित केला आहे. ते लिहितात, " प्रवर्ग्य विद्या म्हणजे सोमरस तयार करण्याची विद्या होय. मधुविद्येचें स्पष्टीकरण मात्र कोठें आढळलें नाहीं." [ पहिलें मंडळ, पा ७०. ]

ही ' मधुविद्या ' म्हणजेच पर्यायानें ' आपविद्या ' म्हटल्यासारखेंच आहे. कारण विष्णु — नारायण हा या उभय स्वरूपांतहि वर्णिलेला आहे. नारायण आणि विष्णु हें मुळांत एकच दैवत असल्याचें निदर्शनास आलें आहे. म्हणून नारायणाचें रहस्य व्यक्त करणारें ' नार ' हेंच ' मधू ' ( पानीय ) असण्याची शक्यता नाहीं काय ? या अनुमानाला सागरकन्या लक्ष्मी ( व आणखी कांहीं देवी ) —कडूनहि दुजोरा मिळाल्यास या तर्काला बळकटी येणार आहे.

---

प्रा. व. मं. सिरसीकर

# भारताचें भावनिक ऐक्य

अखिल भारतीय राज्यशास्त्र परिषदेचें विसावें अधिवेशन २७,२८ व २९ डिसेंबर रोजीं पुणें येथें भरलें होतें. परिषदेंत चर्चिल्या गेलेल्या निबंध विषयांत 'भारतांतील राष्ट्रवाद-विकास आणि बोध' असा एक विषय होता. या विषयालाच पूरक असा परिसंवाद परिषदेच्या तिसऱ्या दिवशीं सकाळीं झाला. 'भारताच्या भावनात्मक ऐक्याची समस्या' या परिसंवादांत सहा वक्त्यांनीं भाग घेतला. पाटण्याचे प्रा. व्ही. पी. वर्मा; रांची येथील प्रा. ई. आशीर्वादम्; वाल्टेरच्या आंध्र विद्यापीठाचे प्रा. एन्. श्रीनिवासन् या परिषदेच्या प्रतिनिधींनीं भाग घेतला. श्री. एस्. एम्. जोशी, श्री. काकासाहेब गाडगीळ आणि प्रा. गोवर्धन पारीख, या निमंत्रितांनीं भाग घेतला. राज्य पुनर्रचनेच्या प्रश्नामुळें देशांत निर्माण झालेलें वातावरण, दक्षिणेंतील द्रविड कझागम मुनेत्र चळवळ, हिंदीच्या भाषिक "साम्राज्यवादा"विरुद्ध प्रमुख दाक्षिणात्य पुढाऱ्यांनीं उघडलेली आघाडी, पं. नेहरूंनीं केलेली भावनात्मक ऐक्याची घोषणा, आणि संयुक्त महाराष्ट्राची समस्या या पार्श्वभूमीचा विचार केला म्हणजे वरील परिसंवादाची आवश्यकता आणि महत्त्व लगेच पटतें. इतकेंच नव्हे तर परिसंवादांत भाग घेतलेल्या वक्त्यांच्या भाषणांत देखील वर उल्लेखिलेल्या पार्श्वभूमीचा कमी-अधिक आविष्कार झालेला आढळून येतो.

भारताचें भावनात्मक ऐक्य ही स्वतंत्र भारताची निकडीची गरज आहे याविषयीं कोणाचेंच दुमत होणार नाहीं. पण हें ऐक्य कसें घडवून आणतां येईल याबद्दल मात्र विद्वानांत मतभेद आढळून येतात. प्रस्तुत लेखांत वर उल्लेखिलेल्या विद्वानांच्या विचारांचा सारांश देण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थातच या प्रयत्नांत असलेल्या दोषांची वा उणींवांची जबाबदारी लेखकावर आहे; परिसंवादांत भाग घेतलेल्या प्राध्यापकांवर वा लोकाग्रणींवर नाहीं हें प्रथमच नमूद करावयास हवें.

### राज्यशास्त्रांतील नवे दृष्टिकोण

प्रा. वर्मा यांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण, आवेशयुक्त भाषणांत भावनात्मक ऐक्याची आवश्यकता आणि तें साधण्यासाठीं आवश्यक असलेल्या उपायांचें विवेचन केलें. राज्यशास्त्रीय विवेचनांत पूर्वीं बुद्धिवादाला प्राधान्य असे. रिकार्डो, हेगेल या विचारवंतांनीं बुद्धीला ( Reason ) मानवी कृतीचें उगमस्थान मानलें आहे. एकोणिसाव्या शतकांत मानसशास्त्रीय उपपत्तीला महत्त्व देण्यांत येऊं लागलें. फ्रॉईड आणि अन्य मानसशास्त्रज्ञांनीं बुद्धि ऐवजीं सहज प्रवृत्तींचें मानवी मनावर असलेलें प्रभुत्व निदर्शनास आणलें. तर्कातीत (non-Logical ) असलेल्या या मानवी प्रवृत्तींचा तर्कशुद्ध अभ्यास करणें आवश्यक मानलें जाऊं लागलें. अलीकडील काळांत सामाजिक शास्त्रें व त्यांचे अभ्यासक मानवी इतिहासाच्या एकांगी ( monistic ) स्पष्टीकरणाला सत्य मानीत नाहीं. तर मानवी समाजांतील व्यवहार समजून घ्यावयाचे तर अनेक घटकांच्या गतिमानतेचा विचार ( multi-factional dynamics ) करावा लागतो.

प्राचीन काळीं शंकराचार्यांनीं भारताचें सांस्कृतिक ऐक्य घडवून आणलें पण त्याचें स्वरूप वैचारिक होतें; भावनात्मक नव्हतें. तदनंतरच्या काळांत

परकीय सत्ताधीशांच्या – विशेषत: मोंगल सम्राटांच्या एकमुखी सत्तेमुळें तात्पुरतें ऐक्य निर्माण झालें. पण हें ऐक्य लादलेलें होतें. तें उत्स्फूर्त नव्हतें. थोड्याफार फरकानें स्वातंत्र्यपूर्व काळांत ब्रिटिशांच्या एकछत्री अमलाखालीं असेंच 'ऐक्य' निर्माण झालें. परकीय राजवटीविरुद्ध प्रतिक्रिया या दृष्टीनें भारतीय जनतेंत ऐक्य निर्माण झालें. पण परकीय सत्तेचें उच्चाटन एवढाच नकारात्मक आधार या ऐक्याला होता.

## मध्यमवर्गीयांचें वैफल्य

स्वातंत्र्योत्तर काळांत ऐक्य निर्मितीच्या दृष्टीनें तीन स्तरांचा ( levels ) विचार करणें आवश्यक आहे. (१) इंग्रजी अंमलाखालील प्रांत आणि हिंदी संस्थानें यांत असलेलें महदंतर (२) भाषिक भेद व तज्जन्य अडचणी (३) लोकशाहीच्या स्वीकारामुळें निर्माण झालेल्या फाटाफुटी. उदाहरणार्थ, समतेचा उद्‌घोष चालूं असतांनाच समाजांतील दलित वर्गाला सामावून न घेणें. गलिच्छ वस्त्यांचा एकच प्रश्न उदाहरणादाखल घेतल्यास समतेच्या उद्‌घोषांतील फोलपणा स्पष्ट होईल. मध्यमवर्गाला, कनिष्ठ वर्गाला मिळणारें राजकीय महत्त्व सहन होत नाहीं. याचा परिणाम अर्थातच मध्यमवर्गाच्या मानसिक वैफल्यांत दिसून येतो. सामाजिक अडचणी प्रमाणेंच आर्थिक अडचणी देखील भेडसावीत आहेत. भांडवलशाहीच्या स्वीकारामुळें कर्तृत्वाला प्रोत्साहन मिळतें पण त्यांतूनच विसंवादी परिस्थिति निर्माण होते. बेकारीचा भीषण यक्ष-प्रश्न उभा राहतो. समाजवादाचा तात्त्विक स्वीकार केला असला तरी त्यानें प्रश्न सुटलेले नाहींत. आपल्या नियोजनांत प्रादेशिक समतेचा अभाव दिसून येतो. कांही प्रदेशांचा विकास अधिक, तर अन्य प्रदेशांकडे दुर्लक्ष झालें आहे.

शैक्षणिकदृष्ट्या विचार करतां भावनात्मक ऐक्य निर्माण करण्यासाठीं नव्या धर्तीच्या सांस्कृतिक शिक्षणाची गरज आहे. वादविवाद, चर्चा आणि वैचारिक मंथनांतून भ्रातृभाव रुजवितां येईल.

भारतीय राष्ट्रवादाचें आजचें स्वरूप शिवं व सुंदरं आहे, पण तें तसेंच राहील याची काळजी घेतली पाहिजे. नाहींतर राष्ट्रवाद हा नेहमीच साम्राज्यवादाकडे धांव घेत असतो. ही अधोगति टाळण्यासाठीं राष्ट्रवादाला मानवतावादाचा आधार असला पाहिजे. भावनात्मक ऐक्य साधावयाचें तर राजकीय ऐक्याबरोबरच संपूर्ण देशाचा आर्थिक विकास जलद रीतीनें घडवून आणला पाहिजे. अनिर्बंधी सांस्कृतिक शिक्षणाची तरतूद केली पाहिजे. निरनिराळ्या प्रदेशांतील लोकांच्या मतें सांधणारें आंतरिक ऐक्य निर्माण केलें पाहिजे.

## सर्वव्यापी दृष्टिकोणाची गरज

प्रा. ई. आशीर्वादम् यांनी आपलें विवेचन एखाद्या खिस्ती धर्मोपदेशकाप्रमाणें केलें. त्यांनी भावनात्मक ऐक्यासाठीं भारतीय सर्वव्यापी ( Cosmopolitanism ) वृत्तीची वाढ झाली पाहिजे असें प्रतिपादन केलें. म. गांधींच्या नेतृत्वाखालीं भारतानें स्वत:ची प्रतिष्ठा मिळवली पण आज राष्ट्रीय ऐक्याची निकड आहे. ते निर्माण न झाल्यास आपल्या अस्तित्वालाच धोका आहे. भारताखेरीज अन्य देशांतहि भावनात्मक ऐक्याचे प्रश्न धुमसत आहेत. उदाहरणार्थ, अमेरिकेंतील नीग्रोंचा प्रश्न. पण आपल्या भावनात्मक ऐक्याच्या मार्गांत अधिक अडचणी आहेत.जातीयवाद, भाषिकवाद, प्रादेशिक दुरभिमान आणि आत्यंतिक धर्मांधता. असें त्यांचें थोडक्यांत वर्णन करतां येईल.

ब्रिटिशपूर्व काळांत भारतांत राष्ट्रीय ऐक्य फारसें आढळून येत नाहीं. अशोक वा अकबर यासारख्या सम्राटांच्या काळांत तात्पुरतें ऐक्य निर्माण झालें होतें. प्राचीन धर्मग्रंथांत देखील राजकीय ऐक्यावर भर दिलेला दिसून येत नाहीं. धर्माच्या निवृत्तीपर शिकवणुकीमुळें ऐहिक जीवनांतील समस्यांकडे दुर्लक्ष

झालें. प्रस्तुत काळांत तर जातिसंस्थेचें सामर्थ्य कमी होण्याऐवजीं वृद्धिंगत झालें आहे. राजकीय उद्दिष्टांसाठीं जातीयवादाचा सर्रास उपयोग करण्यांत येतो. जातिव्यवस्था ही प्राचीन काळांतील अप्रगत व ग्रामीण अर्थव्यवस्थेला योग्य होती, पण उद्योगप्रधान नागरी अर्थव्यवस्थेंत ती अडथळाच ठरली आहे.

जातिव्यवस्थेंतून जातीयवाद निर्माण झाला व बोकाळला. अनेक भाषा व अनेक लिपी यांच्यामुळ गोंधळांत भरच पडली. प्रादेशिक दुरभिमान वाढीस लागला. भावनात्मक ऐक्य साधण्यासाठीं खालील उपाय योजणें अत्यावश्यक व निकडीचें आहे. वेषभूषा, खाणें-पिणें इत्यादि दैनंदिन जीवनांत देखील भारतीय सर्वव्यापित्व (Cosmopolitanism) रुजविलें पाहिजे. भारताच्या भूमीशीं, येथील निसर्गाशीं (flora of fauna) नव्या निष्ठा निर्माण केल्या पाहिजेत. मालमत्ता व भौतिक वस्तूंविषयीं नवी जाणीव उत्पन्न केली पाहिजे. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत भारताचें धोरण मानवजातीच्या मूलभूत ऐक्याचा आविष्कार व्हावा यासाठीं असतें. तीच दृष्टि अंतर्गत क्षेत्रांत बाळगली पाहिजे. यासाठीं कौटुंबिक जीवनांतच नागरिकत्वाचें अधिक शिक्षण मिळणें आवश्यक आहे. तसेंच शाळांतून आणि विश्वविद्यालयांतून नागरिकत्वाला पोषक असणाऱ्या गुणांची जोपासना केली पाहिजे. सुविद्य पुरोहितवर्गाची आज गरज आहे. तसेच आंतरजातीय विवाहांचे प्रयोग सावधगिरी बाळगून अधिकाधिक केले पाहिजेत. भिन्न भिन्न संस्कृतीचा संयोग (Cross fertilisation of cultures) होणें आवश्यक आहे. भारताचें भावनात्मक ऐक्य घडवून आणावयाचें तर प्रादेशिक नेत्यांनाच राष्ट्रधुरीण मानण्याची चूक टाळली पाहिजे. देशासाठीं सर्वस्वार्पण करण्याची मनोवृत्ति समाजांत रुजविली पाहिजे.

## दाक्षिणात्त्यांच्या विचारांचें दर्शन

वॉल्टेर येथील प्राध्यापक श्री. एन् श्रीनिवासन् यांचें भाषण पहिल्या दोन वक्त्यांपेक्षां अगदीं निराळ्या प्रकारचें झालें. त्यांत भावनांचा आवेश नव्हता वा उपदेशकांचें कौशल्य नव्हतें पण दाक्षिणात्त्यांच्या मनांतील विचारांचें सत्य पण अप्रिय दर्शन त्यांत घडलें. प्रा. श्रीनिवासन् यांनी राष्ट्र म्हणजे काय याची व्याख्या सांगून त्या व्याख्येप्रमाणें भारताला राष्ट्र म्हणणें कसें अवघड आहे हें श्रोत्यांच्या निदर्शनास आणलें. भारताचा विस्तार, आर्थिक दुरवस्था, अनेक भाषांचें अस्तित्व, भिन्न प्रदेशांची विषम परिस्थिति, इत्यादि कारणांमुळें भारताला कांटेकोरपणें राष्ट्र म्हणणें कसें शक्य आहे ? कोणत्याहि राष्ट्राचें ऐक्य हें विकास पावत असतें. तें कृत्रिम उपायांनीं निर्माण करतां येत नाहीं. धर्म हा ऐक्य निर्माण करणाराहि घटक आहे; दुही माजविणाराच नाहीं. उदाहरणार्थ त्यांनी देशभर विखुरलेल्या मुसलमानांच्याकडे बोट दाखविलें.

भारतीय ऐक्य घडून यावें यासाठीं हिंदीची सक्ति करणें चूक आहे. फ्रेंच, जर्मन आदि युरोपीय भाषा आजदेखील सर्वत्र शिकल्या जातात. कारण त्या शास्त्रीय व तांत्रिक ज्ञानाच्या दृष्टीनें समृद्ध आहेत. हिंदीला असा अभिमान बाळगतां येईल कां ? प्रादेशिक भाषांचा अभिमान हा कोणत्याहि दृष्टिकोणांतून गैर ठरूं शकत नाहीं. भारतीय ऐक्यासाठीं सर्वांनीं मातृभाषेखेरीज अन्य भाषा शिकणें हा पर्याय चांगला आहे. पण यांत देखील कोणत्याहि प्रकारची सक्ति असतां कामां नये. स्वयंस्फूर्त रीतीनें एकापेक्षां अधिक भाषा शिकणें ऐक्याला पोषक ठरेल. भावनात्मक राष्ट्राभिमानाच्या आहारीं जाऊन वस्तुस्थितीकडे डोळेझांक करणें परिणामी घातक ठरेल. इंग्रजीचा वापर करण्याबद्दल अनेकांच्या मनांत न्यूनगंड दिसून येतो. हा न्यूनगंड असावयाचें कारण नाहीं. इंग्रजी ही केवळ परकीय सत्ताधीशांची भाषा नाहीं. ती जगांतील अनेक राष्ट्रांची सामाईक भाषा आहे.

भारताचें भावनात्मक ऐक्य निर्माण व्हावयाचें तर संघराज्यांतील विविध घटकराज्यांना आपापलें धोरण टरविण्याचें वास्तव स्वातंत्र्य हवें. त्यांच्यावर वरून दडपण येऊन चालणार नाहीं. कारण एकतेचा प्रवाह हा खालून वर जाणारा आहे. तसेंच अल्पसंख्याकांना संपूर्ण स्वातंत्र्य हवें. भिन्न मतप्रवाहांचें स्वागत करणें लोकशाहीला अभिप्रेत असतें. सहनशीलतेची वाढ या देशांत झाली तरच ऐक्याला पोषक असें वातावरण निर्माण होईल.

## समान ध्येय हवें

निमंत्रितांपैकीं श्री. श्री. म. जोशी यांनी आपल्या भाषणांत या समस्येविषयीं आपला दृष्टिकोण मांडला. भाषिक तत्त्वावर करण्यांत आलेल्या राज्यपुनर्रचनेचा व संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा उल्लेख त्यांच्या भाषणांत आला. श्री. जोशींच्या मतें राष्ट्रीय ऐक्याची ही समस्या सामान्यपणें समजली जाते तशी सोपी नसून जटिल आहे. विशेषतः स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर संपूर्ण समाजाला आवाहन करणारें असें समान ध्येय आज अस्तित्वांत नाहीं. आज अशा वस्तुनिष्ठ समान ध्येयाची सर्वांत अधिक गरज आहे. स्वातंत्र्यपूर्व काळांत स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं समाजांतील निरनिराळ्या गटांना एकत्र आणणें सोपें होतें. पण स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर याच समाजांतील अनेक कारणांनीं दुरावलेल्या आदिवासी, वर्गीकृत जाति व जमाती मुसलमान यांना सामावून घेऊन एक राष्ट्रजीवन निर्माण करणें अत्यंत अवघड कार्य आहे. या भिन्न समाजगटांचें भावनात्मक एकीकरण अति दुष्कर आहे. स्वातंत्र्यपूर्व काळांत मुसलमान समाजाला समान उद्दिष्टांसाठीं एकत्र आणण्यांत आपल्याला अपयश आलें व या अपयशांतूनच पाकिस्तानचा जन्म झाला हें उदाहरण आपल्याला नेहमी डोळ्यांसमोर ठेवलें पाहिजे. आजच्या राज्यकर्त्यांनी हें सत्य ओळखलेलें दिसत नाहीं. आदिवासी जमातींना समाजजीवनांत एकरूप करून घ्यावयाचें तर वार्षिक सोहळ्याखेरीज आणि भेटीखेरीज अधिक वस्तुनिष्ठ उपायांची गरज आहे. सांस्कृतिक सामरस्य निर्माण करून या अप्रगत समाजगटांना सामावून घेण्याचा प्रयत्न करणें अवश्य आहे. वरील संदर्भांत आज महाराष्ट्रांतें तरी नवबौद्धांना देण्यांत येणारी वागणूक परिणामी अनिष्ट ठरणारी आहे. सरकारनें आपलें सहानुभूतिशून्य व अडवणुकीचें धोरण सोडणें आवश्यक आहे. भावनात्मक ऐक्य हवें तर अशा उपायांची गरज आहे.

भाषावार राज्य-रचना करणें गैर कसें ? एकीकरण हवें तर एकतेचा प्रवाह रोखून चालणार नाहीं. भावनात्मक एकतेचा प्रवाह हा वरून खालीं येत नाहीं. तो उत्स्फूर्त असला पाहिजे. एकतेचा पाया भक्कम हवा. त्यासाठीं भाषिक एकतेवर आधारलेल्या घटकराज्यांची जरूरी आहे. संयुक्त-महाराष्ट्राच्या चळवळीवर आक्षेप घेणारे या चळवळीला फूट उत्पन्न करणारी मानतात. पण हा वस्तुस्थितीचा विपर्यास आहे. आमच्या चळवळीमुळ महाराष्ट्रांतील जातीय वैमनस्य नष्ट होऊं शकलें. उदाहरण द्यावयाचें तर अन्य कोणत्याहि प्रांतांत न घडलेला चमत्कार महाराष्ट्रांत घडला. नाशिकसारख्या पुराणमताभिमानी शहरांत लोकसभेच्या सर्वसाधारण जागेवर एक महार निवडून आला. यांतच भावनात्मक ऐक्याचा पाया आहे.

संयुक्त महाराष्ट्रवादी लोकांना समाजांत फाटाफूट, राष्ट्रीय ऐक्याचा भंग, अथवा परस्पर विद्वेष नको आहे. आज निर्माण झालेला दुजाभाव आम्हाला तिरस्करणीय वाटतो. पण हा दुजाभाव आम्ही निर्माण केलेला नाहीं.

## भावनिक ऐक्य कसें साधेल ?

श्री. काकासाहेब गाडगीळांनीं भाषणाच्या सुरुवातीलाच संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबाबत स्वतःचें श्री. जोशींशीं संपूर्ण तात्त्विक एकमत असल्याचें सांगितलें. संयुक्त महाराष्ट्राशिवाय भावनात्मक

ऐक्य प्राप्त होणार नाहीं. पण समाजापुढील समस्यांचें निराकरण करतांना ऐतिहासिक संदर्भाचा विसर पडून चालणार नाहीं. 'सर्व इतिहास म्हणजे वस्तुतः सद्यःकालीन इतिहास असतो' ( All history is contemporary history ) असें म्हटलें आहे. त्यांत बरेंच तथ्य आहे. आजच्या समस्यानुसार गतेतिहासाचा अर्थ लावण्यांत येतो. इतिहासावर सर्वत्र भौगोलिक परिस्थितीची छाप पडलेली आढळून येते.

भाषा ही समाजजीवनाचा प्रमुख घटक आहे हें वादातीत आहे. पण केवळ भाषा हीच समाजाच्या एकतेचा एकमेव आधार आहे किंवा निर्भेळ आधार आहे असें मानणें योग्य ठरणार नाहीं. उदाहरणार्थ, कॅनडा आणि संयुक्त संस्थानें या दोन राष्ट्रांची भाषा एक असून तीं स्वतंत्र आहेत. हें विसरून चालणार नाहीं. आपण लोकशाहीचा स्वीकार केला आहे. लोकशाही म्हणजे केवळ राजकीय आणि आर्थिक संस्थांची निर्जीव चौकट नव्हे, तर विशिष्ट मनोवृत्ति लोकशाहीला अभिप्रेत आहे. आज भारतांत लोकशाही मनोवृत्ति बाल्यावस्थेंत आहे. अशा परिस्थितींत आपल्याला आपलीं पावलें जपून टाकावयास हवीं.

भावनात्मक ऐक्य साधावयाचें तर ज्याप्रमाणें कुटुंबांत मतमतांतरें असतांना देखील एक मूलभूत सामरस्य असतें तसें प्रदेश व देश या बाबतींत घडून आलें पाहिजे. व्यक्तीचें स्वतंत्र अस्तित्व कायम राहून देखील जशी ती व्यक्ति कुटुंबाचा अविभाज्य घटक असते तसेंच विशाल राष्ट्रजीवनांत घडलें पाहिजे. हें घडावयाचें तर सर्वांची तडजोडीला, सामोपचाराला तयारी हवी. तडजोड हा राजकारणाचा आत्मा आहे. तडजोड करण्यासाठीं लोकशाहीच्या तंत्राची आपणांस माहिती हवी. लोकशाहींत प्रत्येकाला राजकारणांत, समाजकारणांत सहभागी होतां आलें पाहिजे. अशा सहभागित्वाची उत्कट जाणीव व्यक्तीला झाली म्हणजे मग तिचें स्वतःचें मत समाजानें अस्वीकार्य ठरवलें तरी विफलता पदरीं येत नाहीं.

लोकशाहीला अर्थ प्राप्त व्हावयाचा तर प्रत्येक व्यक्तीला स्वाभिमानानें जगण्याची संधि मिळणें ही प्राथमिक गरज आहे. अर्थात् असें जीवन जगण्यासाठीं व्यक्तीची वैचारिक ( Spiritual ) उंची वाढणें जरूर असलें तरी आर्थिक समृद्धिखेरीज असें जीवन अशक्य आहे. भावनात्मक ऐक्यासाठीं समान संधि, सुरक्षित आर्थिकजीवन व्यक्तित्वाच्या विकासाची हमी, भाषण व विचारस्वातंत्र्य यांची खरी गरज आहे. भाषेला भावनात्मक ऐक्यांत निश्चित महत्त्वाचें स्थान आहे. पण उगीचच भाषेचें स्तोम माजवूं नका अथवा भाषेला उपेक्षूंहि नका.

### संकलनात्मक मानवतावाद

परिसंवादांतील अखेरचें भाषण प्रा. गोवर्धन पारीख यांनी केलें. त्यांच्या भाषणांत परिस्थितीचें वस्तुनिष्ठ विवेचन व त्यावरील उपायांचें त्रोटक पण योग्य दिग्दर्शन होतें. भाषणाच्या सुरुवातीला प्रा. पारीख यांनी त्यांच्या पूर्वीच्या वक्त्यांनी केलेल्या भावनात्मक ऐक्याच्या विश्लेषणाचा उल्लेख केला. पण ही समस्या अल्पावकाशांत अथवा सहज रीतीनें सुटणारी नाहीं याचा इशारा दिला. गेल्या दहा वर्षांतील अनेक घटनांमुळें देशांतील फाटाफुटी, दुही, वैमनस्यें उफाळून वर आलीं. त्यामुळें या समस्येची जाणीव सर्वांना झाली. या प्रश्नाचें स्वरूप अतिशय गुंतागुंतीचें आहे आणि त्याचबरोबर हा प्रश्न निकडीनें सोडविणें अत्यावश्यक आहे. आपल्यापुढील ही बिकट समस्या सोडवावयाची तर आपल्याला केवळ भावनांचा विचार करून चालणार नाहीं. वस्तुस्थितीकडे पाठ फिरवून चालणार नाहीं. अप्रिय सत्यें समजून घेण्याची आणि त्यांना तोंड देण्याची तयारी आपण केली पाहिजे. विवेकाची

कांस धरणें आवश्यक आहे. आपल्या देशानें दहा वर्षापूर्वी लोकशाहीचा स्वीकार केला आहे. आज हें लोकशाही राज्य सुदृढ आणि सुस्थिर कसें होईल याचा विचार झाला पाहिजे व त्याप्रमाणें प्रयत्न केले पाहिजेत. लोकशाही स्वरूपाबरोबरच भारत हें एक राष्ट्र-राज्य ( Nation-state ) आहे याचाहि विसर पडतां कामां नये. आपल्या राष्ट्रवादाला करणात्मक ( Positive ) आधार हवा. स्वातंत्र्यपूर्व काळांतील राष्ट्रवादाचें अकरणात्मक स्वरूप आज टिकूं शकलेलें नाहीं.

पण याकडे लक्ष दिलें जात नाहीं. एका संघटित ढोंगबाजीच्या दुष्ट आवरणाखालीं आम्ही आपलें जीवन जगत आहोंत. विधायक स्वरूपाचा नवा राष्ट्रवाद व क्रियात्मक लोकशाही आपण निर्माण करूं शकलों तर जगांतील हा महान् प्रयोग यशस्वी ठरेल. पण या प्रयोगाच्या मार्गांत अनेक अडथळे आहेत. सर्व समाजाला एकत्र आणूं शकणारें देशाचें प्रतीक विभजनामुळें भंग पावलें आहे. स्वातंत्र्यपूर्व काळांतील लोकश्रद्धा ( Myths ) आज निरर्थक ठरल्या आहेत, भूतकाळांतील राष्ट्रनेत्यांचें आवाहन समाजांतील बहुसंख्याकांना स्फूर्ति देण्यास असमर्थ ठरलें आहे. एकसंध राष्ट्रजीवन निर्माण होण्यासाठीं आवश्यक अशा समान इतिहास, एक भाषा, एक धर्म, समान लोकश्रद्धा, या सर्वांचाच भारतांत अभाव आहे. अनेक भाषा, भिन्न लोकश्रद्धा, अनेक धर्म आणि निरनिराळी ऐतिहासिक पार्श्वभूमि भारतांतील समाजांनां लाभलेली आहे.

अशा परिस्थितींत भावनात्मक ऐक्य निर्माण व्हावयाचें तर भविष्यकाळाकडे पाहणें आवश्यक आहे. प्रत्येक भारतीयाला ज्यांत सहभागी होतां येईल अशा उज्ज्वल भवितव्यावरील समान निष्ठा समाजाला एकत्र आणूं शकेल. आपल्या गतेतिहासाचा उपयोग आजच्या समस्या सोडविण्यासाठीं करतां आला पाहिजे. भूतकाळाकडे पाहण्याची आपली दृष्टि डोळस टीकाकाराची हवी; आंधळ्या पुनरुज्जीवनवादी ( Revivalist ) पूजकाची नको. पुनरुज्जीवनवादी मनोवृत्तीमुळें आलेलें नुकसान सर्वांना ज्ञात आहेच. आपल्या देशांत राजकीय लोकशाही सुस्थिर झाली आहे असा अनेकांचा ग्रह झालेला असतो पण तशी वस्तुस्थिति नाहीं. केवळ यंत्रणा म्हणजे लोकशाही नव्हे. विकासशील अर्थव्यवस्था, न्यायपूर्ण समाजरचना, सांस्कृतिक स्वातंत्र्याची हमी या सर्व गोष्टींचा अभाव आहे. केवळ संस्थात्मक चौकटीची उसनवारी आपण केलेली आहे. भारतीय राष्ट्रजीवन निर्माण होण्यासाठीं संकलनात्मक ( integral approach ) ची आज गरज आहे. नव्या लोकश्रद्धा व समान भवितव्यावरील निष्ठा निर्माण करणें जरूर आहे. नाहींतर संघटित ढोंगबाजीलाच शरण जावें लागेल.

---

## आपल्या वस्तु स्वतः तयार करण्याचें व्रत

पृथ्वींत जें निर्माण होतें त्याच्या पोषणाची सोय तींत असते. जें कांहीं निर्माण होतें, त्याच्या बदल्यांत तिला परत मिळत राहिलें तर तिला कांहीं भार होत नाहीं. मलमूत्राचा योग्य उपयोग झाला पाहिजे. खताच्या रूपानें खाल्लेलें अन्न तिला परत मिळूं शकतें. जनावरांचीं हाड इत्यादि शेतांना उत्तम स्थितींत मिळालीं पाहिजेत. जंगलांतील पालापाचोळा असाच व्यर्थ उडून जातो, त्याचा उपयोग झाला पाहिजे. आम्हीं सर्व जर हातांनीं काम करूं आणि परत करण्याच्या सर्व वस्तु पृथ्वीला परत करूं तर पृथ्वी-मातेला मनुष्य-संख्येचा भार व्हावयाचा नाहीं. जोंपर्यंत तुम्ही आपल्या वस्तु स्वतः तयार करण्याचें व्रत घेणार नाहीं, तोंवर कोणतेंहि सरकार तुमच्यासाठीं कसलीहि योजना करूं शकणार नाहीं.

— विनोबा










ले. निकोलाय गॅले : अनु. गोवर्धन पारीख

# लोकशाही आणि हुकूमशाही राष्ट्रांतील विज्ञान व तंत्रविद्या यांच्या विकासाचा प्रश्न

सोविएट रशियानें अनुक्रमें ८३·६ व ५०८·३ किलोग्राम वजनाचे दोन उपग्रह यशस्वी रीतीनें अंतराळांत उडविल्यापासून लोकशाही राष्ट्रांतील वैज्ञानिक व पंडित रशियांतील विज्ञान व स्थापत्य-शास्त्राविषयीं पुनर्मूल्यमापन करूं लागले आहेत. हें यश लोकशाही राष्ट्रांना अजूनहि न सुटलेले अनेक महत्त्वाचे प्रश्नोपप्रश्न सोडविण्याइतकी ज्ञान व कर्तृत्व यांची उंचावलेली पातळी सूचित करतें. विविध क्षेत्रांतील तात्त्विक सिद्धांतांचें प्रत्यक्ष व्यव-हारांत रूपांतर करण्याचें रशियाचें सामर्थ्य त्या-योगानें स्पष्ट झालें आहे.

## यशाचीं वैशिष्ट्यें व परिणती

सोविएट यशाचीं मुख्य वैशिष्ट्यें पुढीलप्रमाणें सांगतां येतील. (१) उपग्रह अंतराळांत धाडण्याच्या कार्यांत सर्वांच्या आधीं रशिया यशस्वी झाला. (२) दुसऱ्या उपग्रहाचें-आणि पहिल्याचें सुद्धां—वजन अमेरिकेच्या सुरुवातीच्या नियोजित उप-ग्रहांच्या मानानें (सुमारें तीन किलोग्राम) इतकें अधिक होतें कीं अमेरिकन उपग्रह सोडण्यापूर्वींच जुने व मागासलेले बनले. (३) सर्व खंडांत कोठेंहि सोडतां येतील अशीं अस्त्रें निर्माण करण्याच्या उपक्रमांत सहज अनुषंगानें म्हणून सोविएट उपग्रह निर्माण झाले. यावरून रशियाच्या शास्त्रीय व तंत्रविद्यात्मक प्रगतीची स्पष्ट कल्पना येते. कारण अशा प्रकारच्या दूरक्षेपक अस्त्राची चाचणी अमे-रिकेनें अजूनहि केलेली नाहीं. (४) अग्निबाणांचें तंत्रज्ञान व नव्या प्रकारचीं इंधनें या क्षेत्रांतील रशियाचा पुढाकार अल्पकालीन ठरण्याचा संभव नाहीं.

सोविएट यशाचा एक परिणाम म्हणजे कम्यु-निस्टेतर जगांत व विशेषत: आशिया व आफ्रिका खंडांतील अर्धविकसित राष्ट्रांत सोविएटचें राजकीय व भावनात्मक वर्चस्व वाढलें हा होय. क्रेमलिननें, हें यश "साम्यवादी समाजरचनेचें"च फळ होय; या मार्गाचा अवलंब केल्यामुळेंच अवघ्या चाळीस वर्षांपूर्वीं मागासलेल्या व कृषिप्रधान देशास सर्वांहून पुढारलेल्या औद्योगिक राष्ट्राला विज्ञान व तंत्रविद्येच्या क्षेत्रांत मागें टाकतां आलें, या मुद्यावर सर्व भर दिला आहे.

अस्त्रनिर्मितींत सोविएट रशिया पुष्कळच पुढें गेला आहे, या जाणीवेमुळें उपग्रहांतील ढोबळ दोषांकडेहि दुर्लक्ष झालें आहे. उपग्रहांचें वजन ध्यानांत घेतल्यास त्यांतील यंत्रसामुग्री व रेडियो-साधनें अगदींच कमी होतीं; आणि आंतील जिवंत प्रवाशाचें अस्तित्व जमेस धरूनसुद्धां ही वस्तुस्थिती नाकारतां येत नाहीं. अंतराळांतील परिस्थितीसंबंधीं सतत माहिती पुरविण्याचा मूळ हेतु असूनहि दोन्ही उपग्रह लवकरच बंद पडले. तरी देखील अमे-

---

१ म्युनिक येथील इन्स्टिटयूट फॉर द स्टडी ऑफ यु. एस्. एस्. आर. या संस्थेच्या बुलेटिन, नोव्हेंबर १९५७ मधील लेखाचा संक्षिप्त स्वरूपांत स्वैर अनुवाद.






रिकेसारख्या संपन्न, सामर्थ्यवान् व तंत्रविद्येंत पुढारलेल्या राष्ट्रावर सोविएटनें मात केली, याचा भावनात्मक परिणाम होणें स्वाभाविक होतें. कम्युनिस्टेतर जगाची उपग्रहाविषयीची प्रतिक्रिया व आपली पीछेहाट दूर करण्यासाठीं अमेरिकेनें टाकलेलीं तातडीचीं पावलें ध्यानांत घेतल्यास पाश्चात्य लोकमताला या घटनेमुळें अत्यंत मोठा धक्का बसल्याचें दिसून येतें.

## उपग्रहांमुळें निर्माण झालेला एक प्रश्न

सोविएट उपग्रहांमुळें एक प्रश्न आपोआपच निर्माण झाला आहे. तो असा कीं : अल्पकाळापुरताच विचार केल्यास, स्वतंत्र समाजरचनेपेक्षां सक्तीच्या श्रमावर आधारलेल्या सामुदायिक नेतृत्वप्रधान सर्वंकष समाजव्यवस्थेंत वैज्ञानिक व तंत्रविद्यात्मक प्रगति अधिक होऊं शकते काय ? साम्यवादी व साम्यवादविरोधी जगांतील कलहाच्या पार्श्वभूमीवर या प्रश्नाला सहजच विशेष महत्त्व प्राप्त होतें.

पहिला उपग्रह अंतराळांत जातांच पाश्चात्य राष्ट्रांतील व विशेषतः जर्मनीमधील वृत्तपत्रें सोविएट यशाला जर्मन शास्त्रज्ञांचें कार्य जबाबदार असल्याचें आग्रहानें सांगूं लागलीं. हिटलरच्या पराभवानंतर अग्निबाण तयार करण्याची जर्मनींतील माहिती व त्या क्षेत्रांतील तज्ज्ञ यांची सोविएटनें केलेली 'लुटालूट' त्यांना उपयोगांत आणतां आली यांत संशय नाहीं. उदाहरणार्थ, १९५४ सालीं अग्निबाण व त्यांची रचना या संबंधींच्या त्यांच्या १६ संशोधन-केंद्रांत अनेक जर्मन तज्ज्ञ काम करीत होते. तथापि यावरून दूरवर टाकलीं जाणारीं अस्त्रें जर्मन तंत्रज्ञांनींच निर्माण केलीं आणि उपग्रहांचें पितृत्वहि त्यांच्याकडेच जातें असें म्हणतां येणार नाहीं. उलट युद्धकाळांत V–1 आणि V–2 या अग्निबाणांच्या निर्मितीस जबाबदार असणाऱ्या तंत्रज्ञांपैकीं सोविएट इतकेच तंत्रज्ञ अमेरिकेंतहि गेले आहेत; व तेथें ते या क्षेत्रांत कार्य करीत आहेत. शिवाय, सोविएटमधील बहुसंख्य तंत्रज्ञांना स्वगृहीं परत जाण्याची परवानगीहि देण्यांत आली आहे. V–2 च्या अग्निबाणाचा निर्माता वर्नर व्हॉन ब्रॉन्; जर्मनींतील अग्निबाण-संशोधनकार्याचा माजी प्रमुख जनरल डॉन्बर्गर आणि डॉ. ली हे जर्मन अग्निबाण-विद्येचे तीन प्रमुख प्रतिनिधी अमेरिकेंत गेलेल्या तज्ज्ञांतच आहेत. सोविएटला त्यांचे साहाय्यकच काय ते नेतां आले. यामुळें जर्मन तज्ज्ञांचें कार्य हाच केवळ निर्णायक घटक समजतां येणार नाहीं हें स्पष्ट आहे.

प्रस्तुत घटनेच्या अभ्यासकांनीं एका महत्त्वाच्या मुद्याकडे दुर्लक्ष केल्याचें दिसतें. अग्निबाण-विद्येशीं प्रत्यक्ष संबंध असलेल्या विज्ञानशाखांत जुने रशियन शास्त्रज्ञ व नवे सोविएट-तज्ज्ञ यांचें कार्य अत्यंत मौलिक व मोठें आहे. प्रत्यक्ष लढाईच्या काळांत देखील जर्मन तज्ज्ञांनीं या विद्येचा तात्त्विक पाया घालणाऱ्या मेश्चेर्स्की, शॅप्लीजीन्, त्सिओल्कॉव्स्की इत्यादि रशियन शास्त्रज्ञांच्या फॉर्म्युल्यांचाच उपयोग केला होता हें प्रसिद्ध आहे.

याबरोबरच आजकालच्या परिस्थितींत केवळ हेरगिरीनें माहिती मिळवून वा एकादुसरा परदेशीय तज्ज्ञ आणून एकादें राष्ट्र विशिष्ट विज्ञान-क्षेत्रांत वा युद्धतंत्रांत आघाडी मारूं शकेल असा मुळींच संभव नाहीं. नव्या कल्पना, नवे शोध व्यवहारांत आणावयाचे म्हणजे त्यांच महत्त्व आकलन करण्याइतकी बौद्धिक आणि उपयोग करण्याइतकी संघटनात्मक तयारी समाजांत असणें आवश्यक आहे. त्यावांचून अत्यंत हुषार वैज्ञानिकांनीं पुढें मांडलेल्या कल्पना देखील तशाच पडून राहण्याचा संभव असतो. यामुळें जर्मन अग्निबाण-विद्येचें यश लागलींच ओळखून ती विद्या आपलीशी करून घेण्याची व आपल्या ज्ञानाशीं तिची सांगड घालून पुढें जाण्याची तयारी सोविएटनें

दाखविली हाच तेथील शास्त्रीय ज्ञानाच्या व संशोधन संघटनेच्या पुढारलेल्या पातळीचा उत्तम पुरावा म्हणतां येईल.

## शास्त्रज्ञांचे अभिप्राय

स्वतंत्र व सर्वंकष समाजांतील विज्ञान व तंत्रविद्येच्या विकासाची निरनिराळी शक्याशक्यता "परकीय वर्चस्वा"च्या सिद्धांतानें स्पष्ट होऊं शकत नाहीं. त्यासाठीं सोविएट युनियनमध्यें काम करण्याची प्रत्यक्ष संधी मिळालेले पाश्चात्य शास्त्रज्ञ किंवा सोविएटच्या अंकित राष्ट्रांतील तसल्याच परिस्थितींत काम केलेले व आपला अनुभव सांगूं शकणारे शास्त्रज्ञ याचें म्हणणें ध्यानांत घेणें अधिक सयुक्तिक होईल. सोविएट बाहेरील दोन थोर शास्त्रज्ञांनीं याबाबतचा आपला अनुभव अलीकडेच सांगितला आहे. व तो काहींसा परस्परविरोधी आहे. यांतील पहिले म्हणजे बेलफास्ट विद्यापीठाचे कुलगुरु सर एरिक् अॅश्बी हे होत. युद्धकाळांत मॉस्कोतील ऑस्ट्रेलियन वकिलातींत ते होते व त्यांनीं रशियन शास्त्रज्ञांबरोबर काम केलें आहे. व दुसरे म्हणजे झाग्रेबच्या अणुसंशोधन-संस्थेचे प्रमुख युगोस्लाव्ह कम्युनिस्ट पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ स्टीफन् डेदिजर हे होत. टिटोचा चरित्रलेखक व्लाडिमिर डेदिजर याचे हे बंधु. सर्वंकष राजवट विज्ञान व तंत्रविद्या यांच्या विकासांत अडथळे उत्पन्न करते असें सर एरिक्ना वाटत नाहीं; उलट युगोस्लाव्ह शास्त्रज्ञ मात्र अर्धविकसित राष्ट्रांनीं सर्वंकष राजवटींतील संघटित विज्ञानकार्याचा माग स्वीकारणें धोक्याचें ठरेल असें सांगतात. हें एक लहानसें आश्चर्यच होय.

सोविएट वैज्ञानिक विकास पांच मलभूत घटकांवर आधारलेला आहे असें सर एरिक् यांचें म्हणणें आहे. "उत्तम बुद्धिमंतांचा पुरवठा; त्यांना योग्य तें शिक्षण देऊन शुद्ध विज्ञानाच्या व तंत्रविद्येच्या विविधक्षेत्रांचे मार्ग दर्शविणारी शिक्षणपद्धति; विज्ञानाला विशेष महत्त्व देणारें सामाजिक वातावरण; अन्य देशांतील वैज्ञानिकांत आढळणाऱ्या विचार प्रवाहांशीं परिचय; आणि कोणत्याहि ढवळाढवळीवांचून आपलें संशोधनकार्य निश्चित करण्याचें व आपल्या सदसद्विवेकबुद्धीनुसार तें करीत रहाण्याचें सोविएट शास्त्रज्ञाचें स्वातंत्र्य." हे ते पांच घटक होत. यांतील पहिले तीन रशियांत खात्रीनें आढळतात असें सर एरिक् निक्षून सांगतात. सोविएट शास्त्रज्ञांच्या पाश्चात्य राष्ट्रांशीं असलेला परिचय कांहींसा मर्यादित असून ते अलग अवस्थेंतच आहेत हें मान्य करूनहि याचा तेथील वैज्ञानिक व तंत्रविद्याविषयक प्रगतीवर प्रतिकूल परिणाम होण्याचा संभव नाहीं असें सर एरिक् यांच म्हणणें आहे. आणि या निदानाचें समर्थन करण्यासाठीं त्यांनीं दोन विवाद्य विधानें केलीं आहेत. एक, सोविएट शास्त्रज्ञांना ब्रिटिश वा अमेरिकन शास्त्रज्ञ ज्यांत रहातात तसल्याच बौद्धिक वातावरणाची गरज आहे कीं नाहीं याबद्दल शंका आहे; निदान तशी त्यांची इच्छा दिसत नाहीं; आणि दुसरें, म्हणजे तुलनात्मक दृष्ट्या बोलावयाचें झाल्यास रशियन वाङ्मयाचा सर्वोत्कृष्ट काळ हा राजकीय झोटिंगशाहीला जिंकतां वा नामशेष करतां आला नाहीं हें होय. त्याबरोबरच सोविएट शास्त्रज्ञांच्या एकाकीपणाबद्दल त्यांनीं कांहीं मजेशीर विधानें केलीं आहेत. हा एकाकीपणा मर्यादित आहे. हवें तें वाङ्मय त्या शास्त्रज्ञांना मिळू शकतें. आणि त्याबरोबरच पाश्चात्य राष्ट्रांतील स्वमताची मांडणी करण्याचें व टीकेचें स्वातंत्र्य किती मर्यादित प्रमाणांतच प्रभावी ठरतें हेंहि दर्शविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. स्वतंत्र समाजव्यवस्थेंतच विज्ञानाचा विकास होऊं शकतो, या कल्पनेंतून एक खोट्या सुरक्षिततेची भावना जन्म घेते असें सर एरिक् यांचें म्हणणें आहे. लायसेंको व त्याचे सहकारी यांनीं केलेली जीवशास्त्रज्ञांची








छळणूक, सर्जेन्ह व अन्य वैद्यक क्षेत्रांतील संशोधकांची हत्या, हैसेनबर्ग व आइन्स्टाइन यांचें सिद्धान्त स्वीकारणाऱ्या पदार्थविज्ञानशास्त्रज्ञावर पाखडली जाणारी आग, इत्यादि घटना व परिस्थितीच्या आधारावर रशियांत विज्ञान फार काळ टिकाव धरूं शकणार नाहीं असा निर्वाळा देणारा एक विचार आहे. तथापि या प्रश्नाचें उत्तर देणें अशक्य आहे असें सर एरिक् यांचें म्हणणें आहे. रशियांत वैज्ञानिक व तंत्रविद्याविषयक प्रगति होत राहील हा अभिप्राय सर एरिक् यांनीं उपग्रह अंतराळांत सोडले जाण्या-पूर्वी केला होता, हेंहि नमूद केलें पाहिजे.

दुसरे शास्त्रज्ञ स्टीफन् डेदिजर् यांनीं आपल्या लेखनांत सर्वंकष राजवटींतील वैज्ञानिक संशोधनाच्या प्रश्नाची चर्चा केली असून तेथील संशोधन पद्धतीच्या अर्धविकसित राष्ट्रांनीं विज्ञानाच्या वाढीसाठीं उपयोग केल्यास काय परिणाम होतील याविषयीं ऊहापोह केला आहे. युगोस्लाव्हियांतील आपल्या अनुभवाच्या आधारावर संघटित शास्त्रीय संशोधनाच्या कल्पनेवर त्यांनीं प्रखर टीका केली असून त्यांतील धोका स्पष्ट केला आहे. गुप्तता राखण्याचें वेड, निश्चित योजने-बरहुकूम काम करण्याच्या मार्गांत राजकीय विचार-सरणींच्या तथाकथित वैज्ञानिक भूमिकेमुळें निर्माण होणारे अडथळे, आणि माणसें व साधनें यांच्या सामर्थ्याचा अकारण व्यय या सर्व कारणांमुळें विज्ञानाच्या प्रगतींत अडथळे निर्माण होतात असें त्यांचें म्हणणें आहे. डेदिजर यांच्या मतानें रशिया अणुसंशोधनकार्यांत पाश्चात्यांची बरोबरी करूं शकला याचीं दोन कारणें देतां येण्यासारखीं आहेत. एक म्हणजे झारशाहीचा वारसा. संशोधनकार्यासाठीं आवश्यक संस्था आणि अत्यंत पुढारलेल्या स्वरूपाची पूर्वतयारी; असें या वारशाचें स्वरूप आहे. आणि दुसरें म्हणजे नुकसानीचा विचार न करतां अत्यंत स्वस्त साधन म्हणून वेठीच्या श्रमशक्तीचा उपयोग हें होय. ( हाहि त्याच्या मतानें जुन्या जमान्याचाच वारसा आहे. )

आर्थिक दृष्टया मागासलेल्या राष्ट्रांत संशोधन-कार्याचा सबळ व व्यापक पाया अस्तित्वांत नाहीं. आणि त्यावांचून मानवी श्रमशक्तीचा भरपूर प्रमा-णांत उपयोग करणें परिणामकारक होऊं शकत नाहीं. यामुळें रशियन पद्धतीचें अनुकरण करून या राष्ट्रांनीं विज्ञानाचा विकास करूं पहाणें धोक्याचें आहे असा स्पष्ट इषारा त्याच्या लेखनांत आहे.

## तुलनात्मक निष्कर्ष

या दोन परस्परविरोधी दृष्टिकोणांची तुलना केल्यास त्यांतून कांहीं महत्त्वाचे निष्कर्ष निघतात, ते असे :

१. सर्वंकष व स्वतंत्र समाजरचनांतील तंत्रविद्येच्या विकासाच्या तुलनात्मक शक्याशक्यतेसंबंधीच्या प्रश्नाला केवळ डेदिजर यांनीं प्रत्यक्ष उत्तर दिलें आहे. सर एरिक् यांचें म्हणणें रशियापुरतेंच मर्या-दित आहे.

२. सोविएट सर्वंकष राजवटींतील तंत्रविद्येच्या विकासाची शक्याशक्यता अजमावतांना तशी शक्यता आहे असें दोघांनाहि वाटतें. तथापि त्यांनीं आपलीं विधानें भिन्न भिन्न अर्थानें केलीं आहेत. रशियांतील भावी वैज्ञानिक विकासाबद्दल ॲश्बींना आशा वाटते. उलट समाजवाद वा साम्यवाद यांच्याशीं कसलाहि संबंध नसलेल्या झारशाहीच्या वारशासारख्या विशिष्ट घटकावर हा विकास आधार-लेला असल्यानें डेदिजरचें त्याबाबतचें म्हणणें सावध-पणाचें आहे.

३. दोहोंतील कोणीहि वैज्ञानिक प्रगतीच्या पात-ळीच्या, समाजशास्त्रांच्या विकासाच्या पातळीवर कितपत आपोआप अवलंबून असतो याबद्दलचा मुळींच ऊहापोह केलेला नाहीं.

४. दोघांना ज्या परिस्थितींत अनुभव मिळाला तिची दखल घेणें जरूर आहे. ॲश्बी हे परकीय










वकिलातींना देण्यांत येणाऱ्या सवलतींच्या आधारें सोविएट व्यवस्थेचें निरीक्षण करणारे एक बाहेरचे गृहस्थ होते. उलट डेदिजरनें स्वतःच त्या समुदायवादी समाजाची निर्मिति व रचना करण्याच्या कार्यांत प्रत्यक्ष हातभार लावला होता. या फरकामुळें त्यांच्या मतभेदांचा अर्थ समजणें सुलभ होईल. दोघींनाहि आजच्या अवस्थेंत रशियाची शास्त्रीय प्रगति चालू राहील असें वाटत असलें तरी त्यांचे मतभेद महत्त्वाचेच म्हटले पाहिजेत.

### आणखी दोन महत्त्वाचे घटक

वरील दोन शास्त्रज्ञांचा पुरावा निःसंशय महत्त्वाचा आहे. परंतु त्याबरोबरच या प्रश्नांतील आणखी दोन घटक विचारांत घेणें जरूर आहे. ते म्हणजे : ( १ ) लष्करी दृष्ट्या महत्त्वाच्या विज्ञानशाखा व सामान्य विज्ञान यांचा निकटवर्ती संबंध आणि तज्जन्य वैज्ञानिक प्रगतीला उत्तेजन देणारें युद्धसंस्थेचें कार्य; व ( २ ) अन्य जगाशीं, शीत वा उष्ण, सर्वव्यापी वा स्थानिक, आर्थिक वा राजकीय, प्रचारात्मक वा वैचारिक पण सतत युध्यमान स्थितींत राहणारें आधुनिक सर्वंकष राजवटींचें व विशेषतः कम्युनिस्ट राजवटीचें राजकीय स्वरूप; हे होत. सोविएट वैज्ञानिक यशाची शक्यता बऱ्याच अंशीं याच घटकांनीं निर्णित केली असून प्रस्तुत लेखांतील प्रश्नाच्या चर्चेंत त्यांना अनन्यसाधारण महत्त्व आहे.

विज्ञानाच्या सामान्य व लष्करी उपयुक्ततेच्या क्षेत्रांत नेहमींच संबंध आढळतो; आधुनिक काळांत तर तो मूलभूत महत्त्वाचा बनला आहे. अणुशक्तीच्या युगाचा प्रारंभ आणि युद्धाच्या कामीं रसायनें व जंतूंचा उपयोग यामुळें सामान्य व लष्करी विज्ञानक्षेत्रांतील भेद नाहींसा झाला आहे. गेल्या दोन्ही महायुद्धांत विज्ञान व तंत्रविद्या यांचा भरपूर विकास झाला आहे. केवळ लष्करी गरजांमुळेंच विविध क्षेत्रांत अनेक शोध लागले असें नाहीं; तर कित्येक शांततेच्या काळांत लागलेले पण कारणवशात् बाजूस पडलेले शोध युद्ध चालू असतांना पुनः पुढें आले व त्यांत अनेक सुधारणा होऊन त्यांचा उपयोग सुरू झाला, व युद्ध संपल्यानंतरहि तो कायम आहे.

साम्यवादी विचारसरणीनें युद्धावस्थेच्या सातत्यावर भर दिला आहे. "भांडवलशाहीचा विनाश झाल्यानें व जगांत सगळीकडे साम्यवादाचा विजय झाल्यानेंच युद्धें बंद होतील. कारण असें झालें म्हणजेच युद्धांना कारणीभूत होणारीं आर्थिक व राजकीय कारणेंच नाहींशी होतात, आणि समाजाची परस्परविरोधी वर्गांतील विभागणीहि लयाला जाते." यामुळें मार्क्सवादाप्रमाणें जगात सगळीकडे कम्युनिझमचा विजय होईतोंपर्यंत युद्धें ही अटळ आहेत. सोविएट कम्युनिस्ट पक्षाच्या विसाव्या परिषदेंत युद्धें टाळतां येणार नाहींत असें नाहीं असें क्रुश्चेव म्हणाला हें खरें. पण याचा अर्थ इतकाच कीं कम्युनिस्ट गटाचें वाढतें सामर्थ्य व कांहीं देशांतील कम्युनिस्ट पक्ष व "समाजवादी शक्ती" यांचें स्वरूप ध्यानांत घेतां तेथें यादवी, किंवा सोविएट सैन्याचा हस्तक्षेप यावांचून कम्युनिझम यशस्वी होण्याची आशा वाटते. तथापि जेथें भांडवलशाही भक्कम पायावर आधारलेली आहे तेथें अशा प्रकारें बदल घडून येणें अशक्य आहे असेंच क्रुश्चेवला वाटतें. तेथें सामर्थ्याचा उपयोग करावाच लागेल.

दोन भिन्न समाजरचना एकत्र सहजीवनाच्या मार्गानें केवळ कांहीं काळापुरत्या वा तात्पुरत्याच राहू शकतात, असा कम्युनिस्ट दृष्टिकोण असल्यानें कम्युनिझम् बाह्य जगाशीं नेहमींच युद्धाच्या अवस्थेंत असतो. यामुळेंच सोविएट रशिया प्रत्यक्ष लढाईंत नसेल त्यावेळीं कोणत्या ना कोणत्या स्वरूपाच्या लढ्यांत यश मिळविण्याची धडपड करीत असतांना आढळतो. शीत युद्धाच्या मार्गानें, भावनांना आवाहन देऊन वा आर्थिक वा छुप्या घुस-








घुसीच्या पद्धतीनें लढयांत यश मिळविण्याचा त्याचा प्रयत्न नेहमींच सुरू आहे.

## युद्धप्रवण राज्यपद्धति

तात्पर्य, सोविएट राज्यसंघटनेची उभारणी प्रामुख्यानें लष्करी गरजा पुऱ्या करण्याच्या दिशेनेंच झाली आहे. यामुळें ही राजवट नेहमीं युध्यमान पायावरच उभी असते. लष्करी गरजा ध्यानांत घेतल्यानेंच सोविएट पंचवार्षिक योजनांचाहि योग्य अर्थ लागूं शकतो. युद्ध व तंत्रविद्येची प्रगति यांचा निकटचा संबंध आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे वरील परिस्थितीमुळें भावी विकाससंबंधीं सोविएट नेत्यांना प्राप्त होणारी अनुकूलता स्पष्ट होते. गेल्या दोन महायुद्धांच्या वेळची परिस्थिती ध्यानांत घेतली म्हणजे या अनुकूलतेचें महत्त्व उघड होतें. अमेरिकेची अर्थव्यवस्था युद्धकालीन गरजांच्या दृष्टीनें जुळविली जात असतांनाच अणुशक्तीच्या संशोधनाच्या दृष्टीनें तेथें झालेलें कार्य उत्तम उदाहरण म्हणून नमूद करतां येईल. उत्पादन क्षेत्र व तंत्रविद्या यांचा त्या काळांतील विकास गुणात्मक व संख्यात्मक अशा दोन्ही दृष्टींनीं अत्यंत मोठा होता हें प्रसिद्ध आहे.

## विकासाचें मूळ कारण

युद्ध संपल्यानंतर पाश्चात्य राष्ट्रांतील अर्थव्यवहार शांततेच्या काळाला अनुकूल स्वरूपाचे झाले. उलट सोविएट रशिया मात्र युद्धाच्या पायावरच उभा होता. यामुळें या दोन गटांतील शास्त्रीय व तंत्रविद्येच्या विकासासाठीं उपलब्ध असलेला वाव वेगवेगळा झाला. नव्या युद्धाच्या सिद्धतेच्या निमित्तानें सोविएट रशियांतील तंत्रविद्येच्या विकासाला गती देण्याचें काम सतत सुरूच राहिलें. आणि शांततेच्या काळांतील अगदी किमान स्वरूपाच्या गरजा देखील मागें पडल्या. लष्करी दृष्ट्या महत्त्वाचें मानलें जाणारें संशोधन व उत्पादन यांनाच प्राधान्य मिळत गेलें. युद्धकाळाप्रमाणेंच आजहि सोविएट तंत्रविद्येच्या व उत्पादनाच्या कार्यांत नफा व काटकसर हीं दोन्हीं तत्त्वें पूर्णतया दुर्लक्षिलीं जात आहेत. सर्वंकष स्वरूपाची हुकूमशाही निश्चित योजनेनुसार शास्त्रीय विकासाचें कार्य पुढें नेऊं शकते आणि इतर सर्व गरजा बाजूस सारून कांहीं विशिष्ट क्षेत्रांत सर्व प्रयत्न एकवटणेंहि अशा राजवटींत शक्य होतें. अस्त्रांची निर्मिती व उपग्रहांचें उड्डाण ह्या अन्न, कापड, पादत्राणें, घरें इत्यादि भोगवटयाच्या वस्तूंच्या तीव्र तुटवड्याच्या काळांत घडून आलेल्या घटना होत.

तात्पर्य, तंत्रविद्येचा विकास व युद्ध यांचा निकटचा संबंध आणि सोविएट आर्थिक जीवनाची युद्धाच्या पायावरील उभारणी हीं सोविएट शास्त्रीय प्रगतीच्या मुळाशीं असलेलीं महत्त्वाचीं कारणें होत. सर एरिक् अश्बी व डेदिजर यांनीं नमूद केलेल्या वैशिष्ट्यांचा त्यांना आधार मिळाला इतकेंच !

सोविएट विकासामुळें कम्युनिस्टेतर राष्ट्रांवर या क्षेत्रांतील स्पर्धा लादली जात आहे. युद्धाच्या पायावर आर्थिक जीवनाची उभारणी करून व शांततेच्या काळांत देखील निश्चित योजना हुकमी नियंत्रणांच्या आधारें पार पाडण्याचें धोरण स्वीकारून अमेरिकेला हा प्रश्न सहज सोडवितां येण्यासारखा आहे. दोन्ही महायुद्धांच्या काळांतील प्रत्यक्ष अनुभवानें या मार्गाची परिणामकारकताहि स्पष्ट केली आहे. तथापि त्यांतून कायमची हुकूमशाही निर्माण होण्याचा संभव आहे ही त्यांतील खरी अडचण आहे. आणि तसें झाल्यास मानवी स्वातंत्र्य व लोकशाही याकरितां उभारल्या जाणाऱ्या कम्युनिझम–विरोधी लढ्याचेंच सारें स्वरूप हास्यास्पद होऊन जाईल. व्यक्तिस्वातंत्र्य अबाधित राखणें व आधुनिक युगांतील तंत्रविद्येच्या विकासाच्या सामाजिक गरजा पुऱ्या करणें हीं दोन्हीं उद्दिष्टें साध्य होऊं शकतील असा, जनता व राज्ययंत्र या दोहींवरहि नियंत्रण ठेवणाऱ्या लोकशाही चौकटींतच, नवा








मार्ग शोधून काढणें ही लोकशाही जगाची आजची मूलभूत गरज आहे.

### एक निर्विवाद सत्य

ही गरज लोकशाही राष्ट्रें कितपत व कशाप्रकारें पुरी करूं शकतील याची चर्चा येथें करणें शक्य नाहीं. मात्र ती पुरी केल्यावांचून स्वातंत्र्य व कम्युनिस्ट चढाई विरुद्ध संरक्षण हीं दोन्हीहि साध्य होणार नाहींत हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. सोविएट यशाची दुसरी बाजू म्हणजे रशियांतील सामाजिक व आर्थिक परिस्थिती होय. ती विचारांत घेतल्यास सांप्रतच्या परिस्थितींतून बाहेर पडण्याचे मार्ग सांपडूं शकतील असें दिसतें. कम्युनिस्टांचें सामान्य जनतेवरील वर्चस्व आणि तंत्रविद्याविषयक हे विजय ज्यांच्या श्रमशक्तीमुळें मिळाले त्यांची प्रत्यही होणारी निर्दय पिळणूक यांना धक्का बसत असून त्यामुळें निर्माण होणारें संकट अधिकाधिक तीव्र होत आहे. सामान्यत: सर्वच समाजांत आज्ञाभंगाची प्रवृत्ति निर्माण होत असून कम्युनिस्ट नेत्यांच्या प्रभुत्वापासून निसटण्याची प्रवृत्ति बळावत आहे.

" सोविएट विज्ञान व तंत्रविद्या यांनीं प्रगतीचे नवेनवे टप्पे गाठले आहेत हें खरें. पण त्याबरोबरच आजवर ज्याबाबतींत आपण पूर्णतया सुरक्षित आहोत असें कम्युनिस्टांना वाटे. अशा त्यांच्या वरवर अत्यंत व्यवस्थित दिसणाऱ्या क्षेत्रांत अव्यवस्था घुसूं लागली आहे. जनतेवरील वर्चस्वालाच तडा जात आहे. जनता त्यांच्या मुठींतून निसटते कीं काय असें वाटूं लागलें आहे." कम्युनिस्टांच्या गुलामगिरींत सांपडलेल्या जनतेच्या स्वातंत्र्य व मानवी हक्क यांसाठीं सुरूं असलेल्या लढ्याचें योग्य मूल्यमापन वरील वर्णनांत आढळतें. पोलंड, हंगेरी व इतर अंकित राष्ट्रांतील घटना हेंच सूचित करतात. सोविएट रशियांत उद्‌भवणारीं निरनिराळीं अरिष्टें, सहाव्या पंचवार्षिक योजनेचा त्याग आणि औद्योगिक व्यवस्थेची पुनर्घटना आणि उपग्रहांचा सामान्य जनतेचा पुनः पाठिंबा मिळविण्यासाठीं करण्यांत आलेला प्रचारात्मक उपयोग यांतहि त्याचेंच प्रतिबिंब आढळतें. तात्पर्य, सोविएट रशियानें मंत्रविद्येंत प्रगति केली आहे हें जसें वादातीत आहे तसेंच कम्युनिझमच्या नांवाखालीं सतत श्रम व पिळणूक यांच्यामुळें मेटाकुटीस आलेल्या व प्रत्यही अधिकाधिक उदासीन होत असलेल्या जनतेच्या जिवावरच ही प्रगति झाली हेंहि एक निर्विवाद सत्य होय.

---

प्रा. वि. वा. कोगेकर

# अवकाशांत मनुष्यप्राणी ?

### " लायका " अमर ठरली !

गेल्या वर्षींच्या ऑक्टोबर महिन्यांत रशियानें पहिला " स्पुटनीक " अवकाशांत यशस्वी रीतीनें पाठवून साऱ्या जगाचें लक्ष एकाएकीं वेधून घेतलें. त्यानंतर ३० दिवसांतच पहिल्या स्पुटनीकपेक्षां आकारानें व वजनानें खूपच मोठा असा दुसरा स्पुटनीक रशियानें अवकाशांत पाठवून दिला. या दुसऱ्या उपग्रहांत विश्वसंचाराचा सर्वप्रथम मान मिळविण्यासाठी रशियानें " लायका " नांवाच्या कुत्रीला पाठवून साऱ्या जगताला थक्क करून टाकलें. त्यानंतर आठ दिवस साऱ्यांचें लक्ष त्या विश्वसंचारिणीबद्दलची नवनवी माहिती मिळविण्याकडे लागलें होतें. आकाशवाणीवरून कित्येकांनी तिच्या भुंकण्याचा आवाज ऐकला, तर कित्येकांनी तिचें हृदय व इतर शरीरस्थ यंत्रें यांचें चलनवलन सुस्थितींत चालूं असल्याचें वृत्त मोठ्या समाधानानें वाचलें. आतां आठच दिवसांत हे रशियन जादूगार त्या विश्वसंचारिणीला पुनरपि पृथ्वीवर आणतील व अभूतपूर्व अशा एक दिलानें साऱ्या राष्ट्रांकडून तिचें 'न भूतो न भविष्यति' असें स्वागत होईल अशा तऱ्हेची मोठी उत्साहजनक आतुरता सर्वत्र निर्माण झाली होती. अखेर ती दुःखद बातमी आली. " लायका "चे पंचप्राण अवकाशांत विलीन झाले. रशियन शास्त्रज्ञांनीं तिला यातनारहित मृत्यु यावा म्हणून व्यवस्था केल्याचें वाचून त्या जगत्प्रिय कुत्रीबद्दलचा शोक कांहींसा कमी वाटला. पण स्पुटनीकच्या आंत, पृथ्वीपासून शेंकडों मैलांवर जरी " लायका " चैतन्यरहित झाली तरीहि " लायका " अमरच ठरली !!

" लायका "च्या कांहीं दिवसांच्या अवकाशवास्तव्यांत शास्त्रज्ञांचीं यंत्रें सारखीं तिच्या शारीरिक क्रियाप्रक्रियांचे वेध घेत होतीं, त्यांत निर्माण होणाऱ्या फरकांची नोंद ठेवीत होतीं. त्यामुळें भविष्यकालांतील प्रयोगांच्या दृष्टीनें फारच मोलाची ठरणारी अवकाशांतील परिस्थितीची माहिती शास्त्रज्ञांच्या संग्रही जमा झाली.

### आतां पाळी माणसाची !

" श्वा, युवा, मघवा " असा क्रम अगोदरच लावून ठेवलेला आहे. त्यामुळें आतां एखादा युयुत्सु वृत्तीचा, धाडसी युवक उपग्रहांतील खोलींत बसवून अवकाश संचारासाठीं मार्गस्थ करण्याचा प्रयोग हीच विश्वसंचार प्रकरणाची पुढची पायरी ठरणार आहे. 'लायका' कुत्री ज्याअर्थीं विश्वांत, महावेगी उपग्रहाच्या अंतरांत कांहीं समय जिवंत राहिली त्याअर्थी कोणताहि प्राणी त्याच अवस्थेंत कांहीं समय जिवंत राहणारच हें सिद्धच झालें आहे.

रशियाच्या या क्षेत्रांतील प्रगतीच्या वेगावरून अशा तऱ्हेच्या विश्वसंचारी मनुष्याबद्दलची वार्ता आतां कोणत्याहि दिवशीं येणें शक्य झालें आहे. मनुष्याला अवकाशांत सुस्थितींत राखण्यासाठीं योजना करतांना सामान्यतः कोणत्या अडचणींचा विचार व परिहार करणें जरूरीचें आहे, याची माहिती देण्याचा प्रयत्न येथें करावयाचा आहे.

### उपग्रहांत पृथ्वीवरील वातावरण

पृथ्वीच्या पृष्ठभागावर वावरणाऱ्या मनुष्यप्राण्याच्या शरीरावर वातावरणाचा विशिष्ट दाब व गुरुत्वाकर्षण या दोहोंचा परिणाम सतत होत असतो. वातावरणाच्या विशिष्ट दाबावर त्याच्या



अनुक्रमणिका







शरीरांतर्गत क्रिया, त्याच्या फुप्फुसांचें प्रसारण–आकुंचन, हृदयाचें स्पंदन इत्यादि जीवनावश्यक क्रिया अवलंबून असतात. मानवी शरीराची अेकंदर रचनाच मुळीं या विशिष्ट दाबाला अनुसरून झालेली आहे. गुरूत्त्वाकर्षण हें गृहीत धरूनच मनुष्याच्या सर्व क्रिया चालतात. भांड्यांतून पाणी तोंडांत ओतून पिण्याची साधी क्रिया गुरुत्त्वाकर्षणावर अवलंबून आहे. पाणी वरून खालीं येतें. पण ज्या ठिकाणीं असें गुरुत्त्वाकर्षण नसेल त्या ठिकाणीं द्रव पदार्थ प्यावयाचा कसा ? हीच अडचण निर्माण होईल. त्यामुळें मुख्य प्रश्न पृथ्वीपेक्षां सर्वच प्रकारांनी वेगळया असणाऱ्या अवकाशांत मनुष्याला सुस्थितींत राखण्यासाठीं पृथ्वीवरील अवस्था कशी निर्माण करावयाची हाच ठरतो.

यासाठीं विशिष्ट हवेचा दाब कायम असलेली एक हवाबंद खोली उपग्रहांत तयार करण्याचा निर्णय करण्यांत आला. यदाकदाचित् अपघातानें या खोलींतील हवेचा दाब कमी झाला तर अवकाशांत चढतांना १० मैलांवर ३० सेकंद, ११ मैलांवर १५ सेकंद व १३ मैलांवर एखादा सेकंद इतकाच वेळ मनुष्य शुद्धीवर राहूं शकेल. याचें कारण या उंचीवरील वातावरण इतकें विरळ असतें व त्याचा दाब इतका कमी असतो कीं मनुष्याच्या शरीराच्या तपमानालाच पाणी उकळूं लागेल. [ तापणाऱ्या पाण्यावर त्याच्या वाफेचा दाब असतो. उष्णतामान वाढतें तसें वाफेचें प्रमाण व तिचा दाबहि वाढत जातो. आणि ज्या वेळीं वाफेचा दाब वातावरणाच्या दाबाइतका होतो तेव्हां पाणी उकळूं लागतें. वातावरणाचा दाब कमी असला तर वाफेचा दाब कमी म्हणजेच उकळण्याचें उष्णतामान कमी अशी परिस्थिति होते. ] म्हणजेच शरीरांतर्गत पाण्याची सरसकट वाफ होऊन जाईल.

यासाठीं दाब कायम राखणाऱ्या रबरी चिलखतांचा उपयोग करण्याची कल्पना निघाली. पण या चिलखतांच्या बोजडपणामुळें त्यांच्यासकट हालचाल करणें फारच त्रासदायक होऊं लागलें. शिवाय हालचालीसाठीं वापरणाऱ्या व्यक्तीचे हात मोकळे ठेवले तर ते कमी दाबाच्या प्रदेशांत धमन्यांच्या प्रसरणामुळें सुजून जातील. याशिवाय गळयाचें संरक्षण फारच अवघड ठरतें. कारण अजून तरी गळयाला बरोबर संरक्षण देणारा पण चुकूनहि गळफांस न ठरणारा असा चिलखताचा भाग तयार व्हावयाचाच आहे. त्यामुळें चिलखतांचा नाद जवळजवळ सोडून देण्यांत आलेला आहे. 'लायका' कुत्री नित्रियंत दाब असलेल्या पूर्णतः हवाबंद खोलींतून विश्वसंचारासाठीं सोडण्यांत आली, याचें कारण हेंच. लायकाचीं जीं चित्रें प्रसिद्ध झालीं त्यांत ती अशा हवाबंद खोलींत आरामशीर बसलेली बहुतेक वृत्तपत्रवाचकांनीं पाहिलेली आहेच.

### उपग्रहांत वातनियंत्रण

या हवाबंद खोल्यांत दाब कायम राखण्यांसाठीं बाहेरील हवा पंपानें आंत खेंचण्याची योजना केलेली असते. सुमारें २० मैल उंचीवर वातावरणाची घनता समुद्रसपाटीवरील वातावरणाच्या तुलनेनें फक्त ४ टक्के इतकी आहे. त्यामुळें पंपाच्या उपयोगानें दाबाखालील हवा आंत खेंचण्याची योजना यशस्वी ठरणार नाहीं. शिवाय, या उंचीवरील विरळ हवेचा विशिष्ट दाब निर्माण करण्याच्या प्रयोगांत उष्णताहि खूपच निर्माण होईल. या विरळ हवेंत असणारा एखादा ओझोनसारखा धोकादायक वायु या हवेबरोबर दाबाखालीं हवाबंद खोलींत पाठविणें म्हणजे विश्वसंचारी प्राण्याचें मरण जवळ आणणेंच होणार. [ ओझोनचा श्वसनाच्या यंत्रावर फार धोकादायक परिणाम होतो. ] त्यामुळें जीवनावश्यक वायूंचा भरपूर सांठा आंत असलेली पूर्ण हवाबंद खोलीच पत्करणें शेवटीं योग्य ठरतें.

अर्थात् या योजनेमुळें या उपग्रहाचें वजन वाढवावें लागेल. शिवाय श्वसनामुळें निर्माण होणाऱ्या










कार्बन-डायऑक्साईड सारख्या धोकादायक वायूंची व ऑक्सिजनरहित तप्त हवेची विल्हेवाट लावण्याचा प्रश्नहि महत्त्वाचा आहे. पृथ्वीवर गुरुत्वाकर्षणामुळें, तप्त अशी उच्छ्वासित हवा आपोआप वर जाते व तिच्या जागीं ऑक्सीजनयुक्त ताज्या हवेचा प्रवाह खालीं सरकतो; अशा रीतीनें हा विल्हेवाटीचा प्रश्न आपोआप सुटतो. पण अवकाशांतल्या उपग्रहांतील खोलींत गुरुत्वाकर्षणरहित उंचीवर हें आपोआप कसें घडणार ? पण जर तसें घडविलें नाहीं तर स्वत:च्या उच्छ्वासानेंच या संचारीचा मृत्यु ओढवायचा. तसेंच उष्णता जर बाहेर जाऊं शकली नाहीं तर त्यामुळें आंतील यंत्रसामुग्री इत्यादि तापूनच नादुरुस्त व्हायची. यावर उपाय म्हणून या उच्छ्वासित वायूंना शोषून घेणाऱ्या रासायनिक पदार्थांचा वापर करावा लागेल. वातनियंत्रणासाठीं ( एअर कंडिशनिंग ) नियंत्रक योजनेंतून फिरवावयाची हवा शून्य अंशाखाली १०० अंशापेक्षां कमी तपमानाला मधून मधून नेऊन तिच्यांतील अनावश्यक वायूंचें द्रवीकरण करून त्यांची विल्हेवाट लावण्याची योजना पुढें आलेली आहे. कारण, पृथ्वीवरून नेलेली हवा अवकाशांतील त्यानिर्वात प्रदेशांत अगदीं काटकसरीनें पुरवून पुरवून वापरण्याची नितान्त आवश्यकता आहे. त्यासाठीं पुन: पुन: शुद्ध करून कमीतकमी हवा गमावून तिचा वापर करणें अगत्याचें ठरतें.

दुसरा प्रश्न वातावरणांतील ओलसरपणाचा, किंवा आर्द्रतेचा ( ह्युमिडिटी ). सामान्यत: हवेंत पाण्याची वाफ स्वल्प प्रमाणांत असतेच. मनुष्यप्राणी व निर्जीव यंत्रें यांच्या चलनवलनांत या हवेंतील ओलसरपणाचें फार महत्त्वाचें स्थान आहे. ( हा एका स्वतंत्र लेखाचा विषयच होईल अितकें त्यांवर संशोधन झालेलें आहे ). हा ओलसरपणा अतिशय जास्त वा मुळांतच नष्ट होण्यानें या चलनवलनांत मोठाच धोका निर्माण होऊन तीं यंत्रें बंद पडण्याची पायरी गांठली जाते. पाणी बरोबर घेऊन जाणें म्हणजे उपग्रहाचें वजन आणखी वाढविणें. म्हणून वातनियंत्रक योजनेंत निर्माण होणारें दंव व मनुष्यशरीरांतील उत्सर्जित द्रव्यें यांपासून पाणी मिळवून ओलसरपणा कायम टिकविण्याची योजना आंखण्यांत शास्त्रज्ञांना व यंत्रज्ञांना लक्ष घालावें लागत आहे. हा झाला वातनियंत्रणाचा प्रश्न.

## सूर्य किरणांपासून बचाव –

उपग्रह पृथ्वीच्या बाहेर गेला कीं त्याचा संचार अत्यंत विरळ वातावरणांत वा वातावरणरहित अशा अवकाशांत होत राहणार. या अवस्थेंत सूर्याचा प्रकाश अत्यंत प्रखर असतो. तसें पाहिलें तर या उपग्रहांतल्या मनुष्याला अत्यंत प्रखर, ज्वलंत असा सूर्य दिसत राहील पण उपग्रहाचा संचार मात्र मिट्ट काळोखांतूनच चालेल. कारण सूर्याचा प्रकाश पसरण्यासाठीं पृथ्वीच्या वातावरणांत बारीक बारीक अणु, परमाणु जितक्या विपुल प्रमाणांत आहेत, तितके बाहेर नाहींतच. अवकाशांत दोन अणूंच्या मध्यें सुमारें १२ मैलांचें अंतर राहील. या उलट समुद्रसपाटीला हवेंतल्या दोन अणूंमध्यें एक दशलक्षांश इंच इतकें अंतर असतें. त्यामुळें ज्या ठिकाणीं एखादा अणु चुकूनमाकून उपग्रहांतल्या माणसाला दिसेल त्या ठिकाणीं प्रकाशाचा एखादा "कण", एक चमकदार कण दिसायचा. या उलट उपग्रहाची सूर्याकडली बाजू झगझगीत प्रकाशानें न्हालेली तर उलट बाजू मिट्ट काळोखानें माखलेली राहणार, आणि आपली पृथ्वी म्हणजे एक निळया रंगानें न्हालेला गोळाच दिसेल. चांदण्या रात्रीं चंद्र दिसतो त्यापेक्षां कितीतरी मनोहर आणि सुखकारक अशी पृथ्वी उपग्रहांतल्या मनुष्याला वाटेल.

उपग्रह त्याच्या पृथ्वीसभोंवतीच्या प्रत्येक प्रदक्षिणेंत पृथ्वीच्या दिवसांतून व रात्रींतून जाईल, आणि त्याचें तपमान अनुक्रमें १००° व ०° इतकें राहील. अर्थात् यामुळें आंतील यंत्रांवर परिणाम होणारच. यासाठीं












आंतील तपमान सामान्यतः पृथ्वीवरील एखाद्या घरांतल्या तपमानाइतकें ठेवण्यासाठीं योजना करावी लागेल, म्हणजे आंतल्या माणसालाहि सुखकारक होईल.

पण याहिपेक्षां धोकादायक प्रकार सूर्यकिरणांपासून होईल. सूर्याकडून येणारे किरण त्याच्या अंतरांत होणाऱ्या स्फोटांपासून निर्माण झालेले असतात. असे स्फोट सारखे घडतच असतात. पण प्रत्यक्ष स्फोटाच्या क्षणीं हे किरण मोठ्या प्रखरतेनें व वेगानें बाहेर फेंकले जाणारच. पृथ्वीवरील वातावरण या स्फोटक प्रखरतेपासून आपला बचाव करतें म्हणून त्याची आपल्याला फारशी जाणीव होत नाहीं. पण अवकाशांत तें रक्षण नाहीं. सूर्याकडून येणारे अतिनील किरणहि मोठ्या धडाक्यानें उपग्रहावर मारा करतील. उपग्रहाच्या धातूंच्या भिंती या किरणांपासून विश्वसंचारींचा बचाव करतील. पण उपग्रह संचालकाला तर बाहेरची दिशा कायम राखण्यासाठीं एखाद्या झरोक्याची जरूरी राहणारच. यासाठीं अतिनील किरणांना शोषूनहि पारदर्शक राहणाऱ्या पदार्थाचें आवरण या झरोक्यावर लावावें लागेल. पण या किरणांचा झपाटा फारच प्रचंड असल्यामुळें हें आंवरण फार काळपर्यंत पारदर्शक रहाणें दुर्घटच. यासाठीं प्रखर सूर्यप्रकाशाच्या वेळीं झरोका झांकून टाकण्याची कामगिरी करणारें एखादें आंवरण शोधून काढावें लागेल. म्हणजे बाहेर प्रखर सूर्य असूनहि मिट्ट काळोखाचें साम्राज्य उपग्रहवाहनाच्या आंत राहणारच. वाहनसंचालन म्हणजे आंधळ्या कोशींबिरीचा खेळच ठरायचा !

## विश्वकिरणांचा धोका ?

विश्वकिरणांचा संचार अवकाशांत अप्रतिहत रीतीनें असणारच. विश्वसंचारींच्या शरीरांत जर हें विश्वकरण घुसले तर त्यांच्या डोळ्यांचीं भिंगें व शरीराची कातडी यांवर वाईट परिणाम होईल. कदाचित् मज्जातंतूंच्या पेशींचा समूळ नाश, व जननक्षमतेवरहि तीव्र परिणाम होईल अशी कांहीं शास्त्रज्ञांना शंका वाटते. याबाबत संशोधन करण्यासाठीं कांहीं प्रायोगिक प्राणी फुग्यांचे साहाय्यानें वातावरणांत बऱ्याच उंचीपर्यंत सोडण्यांत आले. या प्रयोगांत प्रायोगिक प्राणी म्हणून माकडें व आल्बीनो जातीचे उंदीर वापरले होते. १७ मैल उंचीवर हे प्राणी ३५ तासपर्यंत ठेवण्यांत आले. पृथ्वीवर परत आल्यानंतर या प्राण्यांचें निरीक्षण करण्यांत आलें. सुमारें ६ महिने निरीक्षण केल्यानंतर असें आढळून आलें कीं मज्जातंतूवरील परिणाम अपेक्षेअितका तीव्र नव्हता. अितरहि परिणाम अपेक्षेपेक्षां खूपच कमी प्रमाणांत घडलेले दिसले. डॉ. म्युलर ( रेडिओ बॉयॉलजींतील नोबेल पारितोषिकाचे विजेते ) यांच्या मतें जननक्षमतेवरील परिणाम फक्त एका पिढीपुरताच मर्यादित राहील. विश्वसंचारींच्या मुलांना त्यापासून धोका मुळींच नाहीं.

## पडल्या पडल्या विश्वसंचार.

एका ठराविक वेगानें जोपर्यंत वाहन जात असतें तोपर्यंत त्यांतील उतारूंना कांहींच त्रास होत नाहीं. मग तो वेग कितीहि असो. १८००० मैलांच्या वेगानें जाणाऱ्या उपग्रहांतील विश्वसंचारींना या वेगाचा त्रास कांहींच होणार नाहीं; अितकेंच नव्हे तर त्यांना त्या वेगाची जाणीवसुद्धां होणार नाहीं. आपली पृथ्वी ताशीं ६४००० मैलांच्या वेगानें सूर्याभोंवती भ्रमते आहे याची कुठें आपल्याला कल्पना असते ? पण हा वेग ज्यावेळीं एकदम वाढतो किंवा कमी होतो त्यावेळींच खरा धोका असतो. या वेगवर्धनाचा ( अॅक्सिलरेशन ) परिणाम गुरुत्वाकर्षणाची दिशा व वेगवर्धनाचा प्रत्यक्ष काळ या दोहोंवर अवलंबून असतो. थोडें थोडें वेगवर्धन खूप वेळपर्यंत होत राहिलें तर मानवी शरीरांतील यंत्रें नादुरुस्त होऊं शकतात, आणि शारीरिक स्वास्थ्य नष्ट होऊन जातें. या उलट एकदम जोराचें वेगवर्धन







झालें तर हाडांच्या सांगाड्याला धोंका पोहोचतो. विश्वसंचारीला अवकाशांतील कक्षेपर्यंत पोचेतों कितीशा वेगवर्धनाला तोंड द्यावें लागेल याचा शास्त्रज्ञांनी गणिताच्या साहाय्यानें अंदाज केला आहे. तो असा – या विश्वसंचारीला १० मिनिटेंपर्यंत ९६ फूट प्रतिसेकंद प्र. से. अितक्या वेगवर्धनाला व २ मिनिटें ३२० फूट प्रतिसेकंद प्र. से. अितक्या वेग वर्धनाला तोंड द्यावें लागेल. [ वेग 'क्ष' फूट प्रतिसेकंद असला तर वेगवर्धन 'य' फूट प्रति-सेकंद प्रतिसेकंद असें लिहावें लागतें, कारण वाढ ही प्रत्येक सेकंदाच्या वेगांत सेकंदांतच होत असते. ] कोणत्याहि वस्तूचें पृथ्वीवरील वजन हें गुरुत्वाकर्षणाच्या ओढीवर अवलंबून असतें. गुरुत्वाकर्षणामुळें होणाऱ्या वेगवर्धनाची किंमत ३२ फूट प्रतिसेकंद –प्रतिसेकंद अितकी असते व आपलीं पृथ्वीवरील वजनें या वेगवर्धनानें मापलेलीं असतात. हें वेगवर्धन ज्या प्रमाणांत वाढतें त्या प्रमाणांत हीं वजनेंहि वाढत जातात याबाबत केलेल्या संशोधनांत असें आढळलें कीं, सामान्य निरोगी मनुष्य ऊर्ध्वमुख पहुडला असेल तर त्याची छाती सामान्य गुरुत्त्वाकर्षणाच्या १५ पट वेगवर्धनाच्या शक्तीला ५ सेकंदपर्यन्त सहज तोंड देऊं शकेल. याउलट अधोमुख अवस्थेंत तो ७ पट वेगवर्धनाची शक्ति १० मिनिटें व १० पट वेगवर्धनाची शक्ति १०० सेकंदपर्यंत सहज बिनधोकपणानें साहूं शकेल. कांहीं शास्त्रज्ञांच्या मतें ही अधोमुख अवस्थाच जास्त सोईची; कारण त्यामुळें वाहन संचालनहि सहज, सुखेनैव करतां येईल. अशा रीतीनें अधोमुख अवस्थेनें मागें दिलेल्या गणिताच्या अंदाजाप्रमाणें जास्तींत जास्त १० पट वेगवर्धनाच्या शक्तीशीं सहजच सामना देतां येईल. एकूण काय ? विश्वसंचारी वाहन-चालकाला बंदूक मारतांना सैनिक जसे पहुडतात तसें आरामशीर पडूनच विश्वसंचार करावा लागेल.

## गुरुत्त्वाकर्षणरहित अवस्था

एकदां हें विश्वसंचारी वाहन अवकाशांत पोंचलें कीं त्यांतील संचारी गुरुत्त्वाकर्षणरहित अवस्थेंत पदार्पण ( उपग्रहार्पणच ! ) करतील. अजून तरी या अवस्थेचा कुणालाच अनुभव नाहीं. पृथ्वीवरील आपले सर्व व्यवहार गुरुत्त्वाकर्षणांत इतके गुरफटलेले आहेत कीं या नव्या अवस्थेंत विश्वसंचारी पृथ्वीजनाला फारच विचित्र अवस्थेचा प्रत्यय येईल. १९५१ मध्यें अमेरिकेंत जेट विमानांच्या संचालकांना व उतारूंना अशा गुरुत्त्वाकर्षणरहित अवस्थेंत सुमारें १६ सेकंदपर्यंत ठेवून त्यांचें निरीक्षण करण्यांत आलें. जोपर्यंत ही मंडळी त्यांच्या "सीटस्" वर बांधलेली होती. तोपर्यंत त्यांची दिशा जाणण्याची शक्ति अविकलित होती. इंद्रियें व बुद्धि यांचा मिलाफ योग्य होता. हृदयाचीं स्पंधनेंहि फारशीं वाढलीं नव्हतीं. यावरून असा अंदाज करण्यांत आला आहे कीं विश्वसंचारीला जास्तींत जास्त त्रास म्हणजे किरकोळ प्रवासी-मळमळ व अगदींच किरकोळ बौद्धिक संभ्रमावस्था प्राप्त होईल. "लायका"च्या बाबतींत आलेले या संबंधांतले अनुभव मनुष्याच्या अवस्थेचा अंदाज करण्यांत कितपत उपयोगी पडतील याबद्दल शंका बाळगायला खूपच जागा आहे.

## उल्कावृष्टि व विश्वसंचारी

विश्वसंचारी उपग्रहावर बारीक बारीक उल्कांची वृष्टि होऊन त्यापासून मोठाच धोका निर्माण होण्याचीहि शक्यता आहे. ही वृष्टि प्रचंड असते. दरसाल लाखो टन वजनाचे एकूण उल्काकण पृथ्वीवर येत असतात. या कणांचा आकार फारच लहान असतो. कित्येक तर टांचणीच्या डोक्याएवढे असतात. पण ते इतक्या वेगानें व इतक्या प्रचंड शक्तीनें येत असतात कीं असा एखादा कण विश्वसंचारी उपग्रहाच्या धातूंच्या भिंतींत बारीक छिद्र सहजच पाडूं शकेल. ज्या ठिकाणी हा कण आपटेल त्या बिंदूवर इतकी उष्णता निर्माण होईल कीं पोलाद










सहज वितळून जाईल. अशा रीतीनें पडलेल्या छिद्रांतून हवाबंद खोलींतली हवा हळूंहळूं निसटूं लागेल आणि आंतील जीवन नष्ट होईल. अशा धोक्याचा संभव बराच असल्यामुळें जरी संचारींना अगोदर सूचना देण्यासाठीं घंटा वगैरे वाजविण्याची व्यवस्था केली तरी हवेच्या निसटण्यामुळें दाब कमी झाल्यामुळें विश्वसंचारी जहाजाला एकदम पृथ्वी-कडेच वळावें लागेल.

यावर उपाय म्हणून एक दुहेरी आवरण असलेली भिंत विश्वसंचारी वाहनाभोंवतीं ठेवावी असाहि कांहीं शास्त्रज्ञांनी टूट काढला. त्यामुळें मुख्य आघातानें बाहेरचें आंवरण छिद्रलें तरी आंतलें आंवरण शाबूत राहील व संचारींना बाहेरील छिद्र बुजविण्याची कामगिरी करण्यास संधि व वेळहि सांपडेल अशी त्यांची कल्पना आहे. पण यामुळें संचारी वाहनाचें वजन अधिकच वाढेल. अशा रीतीनें संरक्षणाचा प्रश्न सोडवितांना वाढत्या वजनाचा नवीनच प्रश्न उत्पन्न होतो.

पहिल्या व दुसऱ्या स्पुटनीकवरून रशियानें केलेल्या निरीक्षणावरून मात्र उल्कावृष्टीचा धोंका अपेक्षेपेक्षां खूपच कमी आहे असें आढळून आलें. तरीहि मनुष्यप्राण्याला घेऊन जाणाऱ्या संचारी वाहनाच्या बाबतींत अशा तऱ्हेचे धोंके कितीहि कमी असले तरी, केवळ दैवायत्त ठेवून प्रयोग करण्यास शास्त्रज्ञ व सरकारें तयार होतील असें वाटत नाहीं. त्यामुळें सर्व अपेक्षित अपायांवर योग्य व शक्य तितकी उपायांची व्यवस्था वाहन तयार करणाऱ्यांना करावीच लागेल. आणि हीच कदाचित् या बाबतींतली मोठी अडचण ठरणार आहे.

मनुष्याच्या अवकाश भ्रमणांच्या वाटेंतला सर्वांत मोठा यक्षप्रश्न पृथ्वीवरील पुनरागमनाचा आहे. जोंपर्यंत विश्वसंचारी वाहन विकल, छिन्नविच्छिन्न न होतां पृथ्वीवर आणतां येण्याइतकी यांत्रिक व तांत्रिक प्रगति होणार नाहीं; तोंपर्यंत केवळ "कल्पनेच्या वारूवरी बैसोनिया" मनःपूत विश्वसंचार करणें, इतकेंच उत्साही व धाडसी मनुष्याच्या हातांत राहणार.

या सर्व अडचणींचा परिहार होणें अगदीं शक्य आहे. २० वें शतक संपण्याच्या आंतच मनुष्याचा विश्वसंचार सुरूं होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. राजकारणी लोकांनीं तर पृथ्वीबाहेरील अवकाशाची सार्वभौम मालकी कोणाची ? या प्रश्नावर जागतिक सभांमध्यें चर्चा सुरूहि केल्या आहेत. कारण एकदां कां विश्वसंचार सुरूं झाला कीं पृथ्वीवरच्या स्वामित्वाचें महत्त्व फारच कमी होईल. शंकराच्या तिसऱ्या नेत्रासारखा विश्वसंचारींचा उपयोग करतां येईल. जरूर तेव्हां निरीक्षणासाठीं; पडेल तेव्हां निःपातासाठीं !!

उपग्रहांतील यंत्राकडून अपेक्षिलेलीं कित्येक कामें जास्त चांगल्या रीतीनें करून विश्वज्ञान संपादण्यासाठींहि मनुष्याचा विश्वसंचार उपयोगी पडेल. सापेक्षतावादाच्या तत्त्वावरून लॉरेन्टझ् या शास्त्रज्ञानें काढलेल्या उपसिद्धान्तान्वयें पृथ्वीवरील काळ व पृथ्वीबाहेरील काळ यांत खूपच फरक आहे. म्हणजे विश्वसंचारी मनुष्य पृथ्वीवरील त्याच्याच बरोबर जन्मलेल्या माणसापेक्षां उशीरा वृद्ध होईल, कारण विश्वसंचारांत त्यानें घालविलेला काळ पृथ्वीवरच्या काळापेक्षां कमीच असणार. समजा, दोन जुळे भाऊ आहेत. त्यांपैकीं एकजण २० व्या वर्षी विश्वसंचारार्थ बाहेर पडला. तो परत येईल त्या वेळीं जर त्याचा पृथ्वीवरील भाऊ ३८ वर्षांचा झालेला असेल तर तो स्वतः प्रकाशाइतक्या वेगानें विश्वसंचार केल्यामुळें फक्त २५ वर्षांचाच होईल. [ स्थिर जागेंतला काळ व वेगानें जाणाऱ्या वाहनांतला काळ यांत फरक असतो, असा उपसिद्धान्त ].

अर्थात् या उपसिद्धान्ताला प्रत्यक्ष पुरावा एखादा मनुष्य प्रत्यक्षच विश्वसंचार करून आल्याशिवाय कसा मिळणार ? उपसिद्धान्त खरा ठरला तर मात्र फारच गंमतीदार प्रसंग निर्माण होतील, हें मात्र निःसंशय !!

---








डॉ. प्र. न. जोशी

# खाजगी शिक्षणसंस्था : कांहीं समस्या

हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या गेल्या दहा वर्षांच्या काळांत शिक्षणक्षेत्रांत अनेक महत्त्वाचे प्रश्न निर्माण झाले आहेत. झपाट्यानें खालावत चाललेल्या शिक्षणाचा दर्जा सुधारावा; कित्येक वर्षें रेंगाळत राहिलेल्या साक्षरताप्रसाराच्या कामास गति कशी द्यावी; प्रौढांच्या शिक्षणाची दिशा कोणती असावी; मूलोद्योगी शिक्षणाची व्यावहारिक उपयुक्तता कशी वाढवावी; धंदेशिक्षणाच्या सोयी सार्वत्रिक कशा होतील; कर्तबगार, ध्येयनिष्ठ आणि बुद्धिमान शिक्षक-वर्ग या क्षेत्राकडे आकर्षित कसा होईल; परीक्षा-पद्धतींत कोणत्या सुधारणा व्हाव्यात; शिक्षणाचें —उच्चशिक्षणाचें माध्यम कोणतें असावें; सर्वसाधारण मध्यमवर्गीयास शिक्षण कसेंतरी मिळूं शकतें पण या देशांतील सर्व थरांतील गरिबांना देखील योग्य त्या प्रकारच्या शिक्षणाची संधि कशी देतां येईल; या व यासारख्या अनेक महत्त्वाच्या प्रश्नांची चर्चा आज सर्वत्र सुरू आहे. अनेक समित्या नेमल्या जात आहेत, अनेक अहवाल तयार केले जात आहेत, त्या अहवालांचें परीक्षण करण्यासाठीं पुनः समित्या, पुनः त्यांनी सुचविलेल्या उपायांच्या प्रयोगांसाठीं छोट्या समित्या तयार होत आहेत. अनेक प्रकारचे सेमिनार्स आणि वर्कशॉप्स शिक्षणाच्या सुधारणेस हातभार लावीत आहेत, परदेशचे शिक्षणतज्ज्ञ भारतांत येऊन कांहीं नव्या योजना सुचवीत आहेत, एकूण सारा शिक्षणप्रांत ढवळून निघत आहे. सर्वसामान्य नागरिक, पालक, वृत्तपत्रांचे संपादक, पुढारी, शिक्षक आणि विद्यार्थी यांपैकीं कोणीच प्रचलित शिक्षण-पद्धतीबद्दल संतोषी नाहींत. नव्यानें उभारल्या जाणाऱ्या राष्ट्राच्या उत्कर्षाच्या एका प्रमुख साधना-वर आजकाल कडाडून टीका होत आहे.

### टीकेचें जुनेंच स्वरूप

पण ही अशा प्रकारची टीका आजच होत आहे काय ? थोडया बारकाईनें विचार केल्यास हा असं-तोष गेल्या शतकभर या ना त्या कारणानें प्रकट होत राहिला आहे. सन १९०६ सालीं म्हणजे सुमारें पन्नास वर्षांपूर्वी लो. टिळक याविषयीं उद्वेगानें लिहितात :

" ... पण हें आमचें सरकार आमची पोटच्या पोराप्रमाणें काळजी न करतां सावत्र पोराप्रमाणें किंबहुना त्याहूनहि कमी दर्जानें आम्हांस वागवीत असल्यानें आम्ही यांच्या राज्यव्यवस्थेच्या धोरणानें हतभाग्य आणि दुर्दैवी बनलो आहोंत. धिक्कार असो या सुधारलेल्या सरकारला कीं ज्याच्या कार-कीर्दींत शंभर वर्षांच्या शिक्षणानें लोकांना आग-काडया कशा कराव्या हें शिकविलें गेलें नाहीं, किंवा कोटयवधी रुपयांचा ऊंस या देशांत होत असतांना स्वदेशी साखरेचे धंदे बुडून जाऊन मारीशस बेटांतील इंग्लिशांचीच नव्हे तर जर्मनी-सारख्या परदेशांतील कोटयवधी रुपयांची साखर या देशांत येऊं लागली ! कापडाचा धंदा बुडाला, तेलाचा धंदा बुडाला, चामडयाचा धंदा बुडाला, आणि आम्ही निव्वळ शेतकरी बनलों .... "

याहिपूर्वी म्हणजे १८७२ मध्यें कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर यानीं ' शिक्षकाचें काम ' या आपल्या लेखांत प्रचलित शिक्षणपद्धतीचें मोठें मर्मभेदक वर्णन केलें आहे. " हल्लीं विद्येचा फार फैलाव झाला व अभिरुचि वाढली, असें वाटतें पण ती भ्रांति आहे.







केवळ सरकारी चाकरीच्या लोभानेंच आमचे लोक विद्या शिकतात. त्यांना विद्येचें व्यसनच काय पण साधी आवडहि नसते. युनिव्हर्सिटीचे झगे अंगांतून काढतांना त्याबरोबरच स्वदेशाभिमान, विद्याभिरुचि, दुर्जनतिरस्कार वगैरे सणावाराच्या दिवशीं घालावयाचीं जीं मनाचीं अलंकारभूषणें तींहि ते काढून ठेवतात. स्वत: शिक्षकालाच आपल्या कामाची थोरवी वाटत नाहीं. मग ती इतरांना कशी वाटावी ? उपाय नाहीं म्हणून शिक्षकाचें काम करावयाचें ही जी त्यांची समजूत तीच लोकांची. पूर्वी गुरुंविषयीं शिष्याचे मनांत पूज्यबुद्धि असे. हल्लीं ती नाहीं. उभयपक्षीं संबंध केवळ स्वार्थाचा. शिकविण्याचे विषयहि बांधलेले. धर्म, नीति वगैरेचें वारें देखील शिक्षणाला लागूं नये अशी सरकारची व्यवस्था."

वरील दोनहि परिच्छेदांतील शिक्षणावरील टीका ध्यानांत घेण्यासारखी आहे. परकीसरकार असल्यामुळें ही सारी अनास्था पसरली असा भावार्थ. म्हणून अशा प्रकारची तळमळ. आणि आज सरकार आपलें असूनहि आपण म्हणावीशी प्रगति करूं शकलों नाहीं याबद्दल अधिक तीव्रतेनें वाटूं लागलें आहे. आतां दोष कोणास द्यावयाचा ? शंभर वर्षांपूर्वी सरकारवर तीव्रतेनें टीका करीत करीत जाणत्या पुढाऱ्यांनीं ओळखलें आणि आपलें शिक्षण आपण सुधारलें पाहिजे अशी जाणीव लोकांना करून दिली. सरकारी शाळांतून हिंदुस्थानच्या तरुण पिढीस स्वदेशचें राजकीय, औद्योगिक आणि सामाजिक वैभव राखण्यास किंवा वाढण्यास समर्थ होईल अशा प्रकारचें शिक्षण मिळणें कठीण झालें; तेव्हां पुढाऱ्यांनीं शिक्षण देण्यासाठीं खाजगी संस्था उभारल्या.

## मोलाचें कार्य

महाराष्ट्राच्या गेल्या शंभर वर्षांच्या इतिहासांत या खाजगी शिक्षणसंस्थांनीं केलेलें कार्य फार मोलाचें आहे. पोटापाण्याचा वैयक्तिक उद्योगधंदा म्हणून या शाळांची निर्मिति नव्हती. प्रखर ध्येयनिष्ठा, अलौकिक स्वार्थत्याग, पवित्र कार्याची तळमळ, राष्ट्रोद्धाराची तीव्र लालसा या सद्गुणांतून महाराष्ट्रांतील प्रमुख खाजगी शिक्षणसंस्था कामास आकार आणीत होत्या. टिळक, आगरकर, चिपळुणकर, आपटे, नामजोशी, कर्वे, रॅ. परांजपे इत्यादींच्या प्रखर ध्येयवादांतून खाजगी शिक्षणसंस्थांनीं आपापले सवते संसार उभे केले होते. पुणें-मुंबईसारख्या शहरांतून एखाददुसरी व्यक्ति खाजगी शाळा चालवीत असे पण तो केवळ पोटाचा उद्योग होता. वेदशाळा, पाठशाळा वगैरेंतून धर्मशिक्षणाचें काम होत असे पण त्याचें स्वरूप सार्वत्रिक नव्हतें. १८२२ च्या सुमारास मद्रास, मुंबई आणि बंगाल या प्रांतांतील एतद्देशीय लोकांनीं चालविलेल्या शैक्षणिक कार्याची पाहणी थॉमस मनरो, एल्फिन्स्टन, विल्यम ॲडम यांनीं केली आहे ती अनेक दृष्टींनीं मनोरंजक आहे. पुणे येथील बाबा गोखले यांच्या खाजगी शाळेचा उल्लेख इतिहासांत अनेकवेळां येतो. १८७४ सालीं वामन प्रभाकर भावे यांनीं नांवारूपास आणलेली 'दि पूना नेटिव्ह इन्स्टिटयूशन' ही सर्वात पहिली हिंदी माणसानें चालविलेली खाजगी शिक्षणसंस्था मानली जाते. यांतून उदयास आलेली 'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी' आज एक प्रमुख शिक्षणसंस्था कार्य करीत आहे. पण पुढच्या काळांत महाराष्ट्रांत निघालेल्या खाजगी शिक्षणसंस्थांनीं अनुकरण केलें तें 'डेक्कन एज्युकेशन' सोसायटी व 'शिक्षण प्रसारक मंडळी' या दोन संस्थांचें. पहिलीला टिळक, आगरकर, रॅ. परांजपे यांच्या त्यागपूर्व ध्येयनिष्ठेनें उजळा मिळाला होता, दुसरीस कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांची प्रेरणा होती, टिळक आगरकरांचें मार्गदर्शन होतें, इंग्रजीचें ज्ञान फारसें नसतांना अगदीं साध्या प्राथमिक शिक्षकांनीं ही शिक्षणसंस्था सुरू








करून एक नवा आदर्श निर्माण केला. विशिष्ट हेतु डोळ्यांसमोर ठेवून या खाजगी शिक्षणसंस्था कामास लागल्या होत्या. या देशाचा उद्धार केवळ शिक्षणानेंच होणार व हें शिक्षण स्वतःच्याच हातीं पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. मोठ्या मानाच्या व पगाराच्या नोकरीचें प्रलोभन दूर सारून, दारिद्र्याचें व्रत पत्करून ध्येयनिष्ठ माणसें या संस्थांना मिळालीं व त्यांनीं महाराष्ट्राच्या शैक्षणिक इतिहासांत एक प्रकारची क्रांति करून टाकली. राष्ट्रीय उत्थानाचें तें एक महत्त्वाचं अंग मानलें जाऊं लागलें. सरकारी अधिकाऱ्यांनींसुद्धां या शिक्षणसंस्थांचा अनेकदां गौरव केला. परप्रांतांतील लोक मोठ्या जिज्ञासेनें व कुतूहलानें महाराष्ट्राकडे पाहू लागले. दोनचार वर्षांपूर्वीं डॉ. राजेन्द्रप्रसाद यांनीं पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजला भेट दिली त्यावेळीं त्यांनीं काढलेले उद्गार मननीय आहेत.

"१९१७ मध्यें महात्मा गांधींच्या बरोबर बिहारमध्यें असतांना आमच्यापैकीं कांहीं जणांनीं महाराष्ट्रांतील प्रसिद्ध पुढाऱ्यांनीं यासंबंधीं चालविलेल्या कार्याबद्दल, विशेषतः या तुमच्या संस्थेविषयीं पुष्कळ ऐकलें होतें. आपणहि याप्रमाणें कांहीं कार्य हातीं घ्यावें असा विचार झाला; आणि आम्ही चंपारण्यांत असतांनाच पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजच्या धर्तीवर आपणहि एक संस्था काढावी असा निश्चयहि झाला. यासंबंधीं प्रत्यक्ष पाहणी करण्यासंबंधी मला पुण्यास पाठविण्याचेंहि ठरलें. ... ..." याप्रकारें पुण्याचा व तेथील शिक्षणसंस्थांचा गौरव अनेकानीं केला आहे. कर्त्या माणसांची एक परंपराच या शिक्षणसंस्थांनीं हिंदुस्थानांत तयार केली; आणि यांचेंच अनुकरण करून महाराष्ट्रांतील इतर संस्थांनीं आपापले संसार थाटले. जिल्ह्याच्या किंवा तालुक्याच्या शहरीं लहान प्रमाणावर का होईना पण शाळा निघाल्या त्या पुण्याच्या या शिक्षणसंस्थांतून शिक्षण घेणाऱ्या कर्तबगार लोकांकडून. आर्यन एज्युकेशन सोसायटी, मुंबई; जनरल एज्युकेशन सोसायटी, मुंबई; इंडियन एज्युकेशन सोसायटी, दादर; अहमदनगर एज्युकेशन सोसायटी; खानदेश एज्युकेशन सोसायटी; शिक्षण प्रसारक मंडळ, नाशिक; कोंकण एज्युकेशन सोसायटी; अशीं किती तरी नांवें देतां येतील. महाराष्ट्रांतील या खाजगी शिक्षणसंस्थांचें कार्य अतिशय उज्ज्वल असें आहे. आज सरकारतर्फे शिक्षण देणाऱ्या शाळा महाराष्ट्रांत फार थोड्याच आहेत कांहीं मिशनरी लोकानीं चालविलेल्या शिक्षणसंस्था सोडून दिल्या तर बिनसरकारी शिक्षणसंस्थांचें कार्य चांगलें नजरेंत भरण्याजोगें आहे. पुढें पंजाब व बंगालमध्यें या महत्त्वाच्या कार्याची महती पटली होती; तेथेंहि खाजगी शिक्षणसंस्थांचा कारभार सुरू झाला; पण तेथीलहि कार्य महाराष्ट्राप्रमाणें सार्वत्रिक नव्हतें. शिक्षण सर्वतोपरी कांहीं अपवाद वगळून लोकांनीं संस्था काढून चालविलें तें महाराष्ट्रांतच. यासाठीं कांहीं ताजे आकडे उद्बोधक वाटतील.

एकंदर हिंदुस्थानचा विचार केला तर १९५५-५६ अहवालाप्रमाणें एकंदर शिक्षणसंस्थांपैकीं शें. २३·९ संस्था सरकारतर्फे चालतात. लोकलबोर्डतर्फे ४१·९ टक्के संस्था चालविल्या जातात. आणि खाजगी शिक्षणसंस्था शें. ३४·२ शाळा चालवितात. यांतील तीन टक्के शाळा सरकारकडून कसल्याहि प्रकारची आर्थिक मदत घेत नाहींत. खाजगी संस्थांची जी संख्या आहे त्यांत ख्रिस्ती मिशनरी लोकांनीं चालविलेल्या शाळा किती यांची स्पष्ट नोंद नाहीं. राष्ट्रीय शिक्षणासाठीं एतद्देशीयांनीं खाजगी शाळा काढल्या तेव्हां त्यांचें ध्येय अर्थातच मिशनरी शाळांहून वेगळें होतें. आज त्यांचे प्रश्न वेगळे आहेत, एतद्देशीय खाजगी शिक्षणसंस्थांचे प्रश्न वेगळे बनले आहेत. केवळ तुलना

म्हणून खालील कोष्टक* पाहण्यासारखें आहे. हिंदुस्थानांतील प्रमुख राज्यांतून शिक्षणाचा वाटा सरकार किती प्रमाणांत उचलतें व खाजगी संस्था किती प्रमाणांत हें कार्य करतात तें ध्यानांत येईल.

सरकारनें चालविलेल्या संस्थांपेक्षां खाजगी संस्थाचा कारभार अनेक दृष्टींनीं आदर्श स्वरूपाचा असल्याचेंहि महाराष्ट्रांत सिद्ध झालें आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळांत खाजगी शिक्षणसंस्थांनीं श्रेष्ठ प्रकारचें, अभिमान वाटावें असें कार्य केलें आहे.

**आजचें स्वरूप**

पण आज त्या संस्था प्रारंभीं वर्णन केलेल्या शैक्षणिक अराजकांत कितपत महत्त्वाचें कार्य करतील हा चर्चेचा विषय झाला आहे. वाडिया कॉलेजनें आपला रौप्य महोत्सव नुकताच साजरा केला, फर्ग्युसननें आपली सत्तरी १९५५ सालीं मोठया समारंभानें डॉ. कैलासनाथ काटजू यांच्या अध्यक्षतेखालीं साजरी केली आणि पुण्याची शिक्षण प्रसारक मंडळी आपल्या अमृतमहोत्सवाच्या नव्या योजना आखीत आहे. अशा वेळीं लोकांच्या मनांत अनेक प्रश्न निर्माण होतात. खाजगी शिक्षणसंस्थांच्या कारभारावर कडाडून टीका होऊं लागली आहे. अध्ययनाची पातळी खालावली, त्यागवृत्ति उरली नाहीं, व्यापारी तत्त्वानें व्यवहार सुरू झाला, सरकारी कैचीत नित्याचा व्यवहारसुद्धां बांधला गेला, विद्यार्थ्यांत शिस्त उरली नाहीं, प्राध्यापक व आजीव सेवक यांचें वर्तन नव्या पिढीस आदर्श असें उरलें नाहीं, राष्ट्रकार्याची धुरा अंगावर वाहून नेण्यास समर्थ असें नेतेपणाचें शिक्षण या संस्थेतून मिळणें अशक्य आहे, विद्यार्थी व शिक्षक यांत पूर्वीचें नातें उरलें नाहीं, बेजबाबदारपणा वाढला, संशोधनवृत्ति, व्यासंग, ज्ञानलालसा, विद्येसाठीं करावी लागणारी तपस्या यांचें महत्त्वच संपल्यासारखें आहे. खाजगी शिक्षणसंस्थावरील टीकेचा हा रोख आतां सर्वांच्या परिचयाचा आहे. तेव्हां प्रश्न सहजच निर्माण होतो कीं ज्या खाजगी शिक्षणसंस्थांना एवढी थोर परंपरा लाभली, व ज्यांनीं देशभक्तांची एक पिढी तयार केली, त्यांना आज स्वातंत्र्योत्तर काळांत कांहीं स्वतःच कर्तव्य आहे कीं नाहीं? नवभारताच्या उभारणीच्या काळांत या संस्थांना कांहीं ' मिशन ' आहे काय ?

या प्रश्नाचें स्पष्ट उत्तर महाराष्ट्रांतील विचारवंत श्री. अच्युतराव पटवर्धन यांनीं ' साधना ' साप्ताहिकाच्या ८–२–५८ च्या अंकांत दिलें आहे. ते लिहितात, " आजच्या सरकारी मदत घेणाऱ्या

| * राज्याचें नांव | सरकारनें चालविलेल्या | लो. बो. शाळा | खाजगी शिक्षणसंस्था |
|---|---|---|---|
| आंध्र | ५ | ४४·२ | ५०·८ |
| आसाम | १६·७ | ६५·३ | १८ |
| बिहार | २·१ | ३२·१ | ६५·८ |
| मुंबई | ·७ | ४६·५ | ५२·८ |
| मध्यप्रदेश | २१·८ | ७२·८ | ५·४ |
| मद्रास | ५·१ | ५०·५ | ४४·४ |
| पंजाब | ३·५ | ८७·८ | ८·७ |
| उत्तर प्रदेश | ३·८ | ८१ | १५·२ |
| प. बंगाल | ९·७ | ६४·६ | २५·७ |
| हैद्राबाद | ८२·२ | ०·१ | १७·७ |
| म्हैसूर | ७२·६ | ३·२ | २४·२ |












खाजगी शाळांपुढें असलें कांहीं उत्स्फूर्त करणारें ध्येय आज नाहीं. नवसमाजाची उभारणी आपल्याला करावयाची आहे अशी भावना यांच्यांत नाहीं. खोटया दैवताविरुद्ध बंडखोरी आपल्याला करावयाची आहे असें त्यांना वाटत नाहीं. सामाजिक जडतेचें आव्हान त्यांना पोंचत नाहीं. समाजांतील अनुदार दृष्टि आणि रुढिग्रस्तता यांच्याशीं प्राणपणानें लढणारे, स्वतंत्र भारताला शोभेसे नव-नागरिक आपल्याला तयार करावयाचे आहेत व त्यासाठीं जरूर तर हाल-अपेष्टांचें जीवन आपण कंठूं या, या भावनेनें आजचे शिक्षक या पेशाकडे वळले आहेत असें दिसत नाहीं. संस्थापकांनीं त्या त्या काळांतील जीं कांहीं उद्दिष्टें समोर बाळगलीं होतीं त्यांच्याच प्रकाशांत आजहि या शाळांचें काम चाललेलें आहे. नव्या जमान्याशीं सुसंगत असें ध्येयधोरण त्यांनीं शोधलेलें नाहीं ...... परिणामतः या शाळांना आज धंदेवाईक रूप आलें आहे आणि लौकिक यशाच्या आकांक्षेनें त्यांच्यांत एक प्रकारची विकृति निर्माण झाली आहे ... ”

श्री. अच्युतराव पटवर्धन यांनीं आजच्या शिक्षणसंस्थांच्या कारभाराचें केलेलें हें विश्लेषण गंभीर असलें तरी त्यांत बरेंच तथ्य आहे. पूर्वींचीं ध्येयें बारगळलीं आहेत, ती निष्ठा, तो त्याग आज दिसत नाहीं, प्राण ओतून संस्था चालविण्याची जिद्द आज चालकांत दिसत नाहीं. परिश्रम आणि व्यासंग कमी प्रमाणांत आहे. स्वार्थ-त्याग तेवढा शिक्षकानेंच कां करावा ? अंग मोडून काम करण्याचें व्रत एकट्या शिक्षकांनींच कां घ्यावें ? अवांतर मार्गांनीं पैसा मिळविण्याचीं साधनें त्यांनीं कां शोधूं नयेत ? असल्या प्रश्नांना आज तात्त्विक स्वरूप प्राप्त झालें आहे. पूर्वींचा काळ निराळा, आत्तांचा निराळा अशी भाषा सुरू झाली आहे. अध्ययन आणि अध्यापन हें एक व्रत आहे. त्याचीं कांहीं पथ्यें आहेत, ती एक पवित्र साधना आहे, हें बोलणेंच आज थट्टेवारी नेण्यांत येतें. समाज आज जागृत होत आहे, ज्ञानाची, विद्येची भूक त्यास लागलेली दिसून येते, मनावर कांहीं उदात्त संस्कार व्हावेत म्हणून तो शिक्षणाकडे वळतो पण त्याच्या पदरांत घोर निराशा पडलेली दिसून येते. पैशाचा व वेळेचा व्यर्थ अपव्यय होत आहे. केवळ अगतिक होऊन नको असलेल्या विषयांचें शिक्षण त्याला घ्यावें लागतें. त्यामुळें त्याचें मन शिक्षणांत लागत नाहीं. मग सहजच हुल्लडबाजी, बेजबाबदार वर्तणुकीचें वागण आणि एक प्रकारची पोषाखी ऐट त्याच्यांत निर्माण होते. अभ्यासेतर चळवळींचें महत्त्व प्रमाणाबाहेर वाढलें. आवश्यक तेवढें नियंत्रण ठेवून समाजाची दानत घडविण्याचें कार्य आज अशा संस्थांकडून होईनासें झालें आहे. आपल्याच गुणांनीं एखादा विद्यार्थी पुढें येईल तो वेगळा, पण असे पद्धतशीर प्रयत्न पुढें आदर्श उभे करून होत नाहींत. या मोठ्या संस्थांना एक प्रकारचें शैथिल्य आलेलें दिसतें. आपल्या मागें थोर परंपरा आहे या आत्मजाणीवेचाहि तो परिणाम असावा. तालुक्याच्या वा जिल्ह्याच्या ठिकाणीं नव्यानें निघालेल्या शिक्षणसंस्थांत जो जिवंतपणा पुष्कळदां दिसतो तोहि येथें अभावानें आहे. सर्वांगांनीं बधिर होऊन राहिलेल्या समाजास ज्ञानदान देण्याचें फार मोठें कार्य ज्योतिबा फुले यांनीं सुरू केलें. त्यांची परंपरा आज या नाहीं त्या स्वरूपांत महाराष्ट्रभर चालू आहे; पण त्यालाहि रूप नीटसें येत नाहींसें दिसतें. स्वराज्य आलें कीं, नव्या जबाबदाऱ्या आल्या, नव्या आकांक्षा आल्या, नवीं कर्तृत्वें उदयास आलीं, तरुण माणसांत नवें रक्त सळसळूं लागलें — असें फारसें कोठें दिसत नाहीं. खाजगी शिक्षणसंस्था या राष्ट्रजागृतीच्या कामांत आज तरी मंदावलेल्या दिसतात.

## दोष कोणाचा ?

हें सर्व खरें असलें तरी हा दोष कोणाचा आहे ? घसरत चाललेल्या शिक्षणाचा दर्जा सावरणें कठीण झालें आहे. खाजगी शिक्षणसंस्था आज तीव्र स्वरूपाच्या आर्थिक संकटांत आहेत. दारिद्र्यानें पिचून गेलेल्या समाजाकडून किती फी घ्यावी याला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं ? स्वस्त शिक्षण देणें हा एक प्रकारचा प्रमुख हेतु संस्थापकांचा होता, पण परिस्थिति झपाट्यानें बदलत चालली आणि आर्थिक जबाबदाऱ्या वाढल्यामुळें शिक्षण महाग झालें. सरकारची मदत आवश्यक तेवढी मिळत नाहीं. पूर्वीसारखे मोठे देणगीदार आज उरले नाहींत; तसेंच पैसा पैसा जमवून परार्थ श्रम करण्याची वृत्तीहि दिसत नाहीं. आतां हें सर्व सरकारनें करावें असा विचार सुरूं झाल्यामुळें खाजगी देणग्यांची प्रथाच मोडत चालली आहे. तुमच्या मोठ्या इमारती दिसतात, गॅदरिंगचा थाट असतो, विद्यार्थी दूरदूरच्या सहलींना जातात, अध्यापकांना पगारहि वेळच्या वेळीं देतां, भरपूर देतां, आतां कशास आणखी पैसा हवा तुमच्या श्रीमंत संस्थेस ? अशी पृच्छा केली जाते. गरीब व लायक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या आवश्यक तेवढ्या प्रमाणांत देतां येत नाहींत. दरवर्षींच्या खर्चाची तोंडमिळवणी कशी करावी हा महत्त्वाचा प्रश्न महाराष्ट्रांतील बहुतेक शिक्षणसंस्थांपुढें आहे.

सरकारचीं बंधनेंहि दिवसेंदिवस वाढत आहेत. 'चतकोर भाकरीची गुलामगिरी ' असें जरी आतां टिळकांप्रमाणें म्हणतां आलें नाहीं तरी तेवढ्या सरकारी अनुदानासाठीं सर्व कांहीं करावें लागतें. पाठ्यपुस्तकें, फीचे दर, शिक्षकांचे पगार, विषयांची वाटणी हिशेब ठेवण्यासंबंधींच्या नव्या योजना इत्यादि अनेक प्रकारच्या दैनंदिन व्यवहारांत सरकार दक्षतेनें असतें. रोज नवें परिपत्रक असल्यामुळें त्यांतील योजना अमलांत आणणें व त्यांना उत्तरें देणें हें एक मोठेंच काम होऊन बसलें आहे. सहोदर संस्थांशीं, पालक वर्गाशीं, सरकारशीं, विद्यार्थ्यांशीं व सहकारी अध्यापकांशीं रोज वाढणारे गुंतागुंतीचे संबंध कसे ठेवावेत हा एक प्रश्न आहे.

खाजगी संस्थांचा कारभार ज्या पद्धतीनें आज चालतो त्याविषयींहि पुष्कळच चर्चा होत आहे. कायम-सेवक व आजीव-सेवक यांचा वाद नुकताच रंगून गेला असला तरी तो संपला आहे असें नाहीं. आजीव सेवकांनीं कां म्हणून आपला स्वतंत्र वर्ग मानावा ? ज्ञानलालसा, त्यागवृत्ति, लौकिक यशाविषयीं अनिच्छा, संस्थेकरतां सर्वस्व अर्पण करण्याची वृत्ति, अर्थप्राप्तीचें अन्य साधन न शोधण्याची दक्षता, किमान सेवेच्या प्रतिज्ञेचें पालन, समाजाला आदर्शभूत असें आचरण व चारित्र्य, नि:स्पृहता, बाणेदारपणा, कळकळ इत्यादि गुणांनीं कोण परिपूर्ण आहे ?

टिळक-आगरकर यांचे काळांतहि कोणी असा होता असें नाहीं. टिळकांच्या प्रसिद्ध राजिनाम्यांत या सर्व मुद्यांचा त्यांनीं विचार केलेला आहे. आजीव सेवकानें आपलें इतर सर्व उत्पन्न संस्थेस द्यावें असें आतां कोण मान्य करील ? फायदा झाला तर संस्थेच्या कार्यास लावावा, आपला पगार वाढवून घेऊं नये असें टिळकांनीं आग्रहानें सांगितलें आहे. मूळ हेतु दूर राहिले असा त्यांच्या लिखाणाचा सूर आहे. " तत्त्वांचीं बंधनें सुटूं लागलीं, व्यक्तिमाहात्म्य वाढूं लागलें, हितसंबंध फैलावूं लागले, इतर धंदे आपणांत शिरले, यामुळ आचारविचाराला व्यग्रता आली; वाद सुरू झाले, पक्ष बनले, मत्सर वाढला, द्वेष उत्पन्न झाला, तोंडमिळवणी कठीण झाली, स्वार्थत्याग, स्वावलंबन व साधेपणा यांची आमच्या आमच्यांत थट्टा सुरूं झाली व त्याचा कंटाळाहि येऊं लागला .. " साठ सत्तर वर्षांपूर्वीं टिळकांनीं केलेली ही विदारक टीका आज तर फार महत्त्वाची वाटते. आजीवसदस्यपद्धतीमुळें कांहीं थोडे फायदे







झाले असतील; पण आतां बदलत्या काळांत तिचें स्वरूप सुधारलें नाहीं तर इतर सेवकांत संस्थेविषयीं आत्मीयता निर्माण होणार नाहीं. आणि ही आत्मीयता संपली कीं खाजगी शिक्षणसंस्थांचें अस्तित्वच उरणार नाहीं.

## मनाच्या मशागतीची योजना हवी

नव्या गरजा निर्माण होत आहेत. शिक्षण घेणारांची संख्या झपाट्यानें वाढत आहे. अशा वेळीं निरनिराळ्या धंद्यांचें शिक्षण देण्याचें कार्य पुरेशा द्रव्य-बळाभावीं खाजगी शिक्षणसंस्था हातीं घेऊं शकत नाहींत. ज्याच्या त्याच्या बौद्धिक पातळीप्रमाणें वा मनोवृत्तीप्रमाणें शिक्षण न देतां एकाच साच्यांतून सर्वांना काढणें परिणामीं धोक्याचें आहे. वेळ व पैसा खर्च होणारच पण दिवसेंदिवस विघटत जाणाऱ्या शिस्तीच्या दृष्टीनेंहि तें बरें नाहीं. शहरांतील चांगल्या चांगल्या माध्यमिक शाळांमध्यें इ. ४० पर्यंतचीं मुलें उगाच नको त्या विषयांची घोकंपट्टी करीत असतात. त्यांना अनुकूल असा शिक्षणक्रम शाळांपाशीं नाहीं, ज्यांच्यापाशीं आहे त्यांना द्रव्यबळ नाहीं. अर्थात् ही विद्यार्थ्यांची मोठी संख्या अनेक प्रकारचे उपद्रव देण्यास उत्सुक असते. दोष विद्यार्थ्यांचा नाहीं. त्यांना योग्य तो शिक्षणक्रम पुरवूं न शकणाऱ्या शाळांचा, संस्थांचा आहे. थोडाफार पैसा उभारून कांहीं तांत्रिक शिक्षणाची सोय केली तरी तिला अनेक कारणांमुळें यश येईनासें झालें आहे. सरकारनें चालू केलेल्या बहुविध शाळांचा प्रयोग अजून चालू आहे. निर्णयास कांहीं आलेलें नाहीं.

समाजाची नवनिर्मिति होत असतांना केवढी जबाबदारी खाजगी शिक्षणसंस्थांनीं पत्करावयास पाहिजे ! ग्रामीण शिक्षणांविषयीं नवे नवे प्रयोग होत आहेत, बुद्धिमापनाच्या कसोट्या ठरत आहेत, माध्यमिक शिक्षण उच्च शिक्षणाशीं योग्य प्रकारें जोडलें जात आहे. निरक्षरता, अज्ञान, दारिद्र्य हे प्रधान रोग आपल्या देशाचे आहेत. कर्तृत्वाचीं नवीं क्षितिजें निर्माण होत आहेत तीं नीट न्याहाळून या तीन रोगांशीं सामना कसा द्यावयाचा यासंबंधीं खाजगी शिक्षणसंस्थांनीं विचार करावयास पाहिजे. समाजाच्या खालच्या थरापर्यंत शिक्षणाचें लोण जावयास पाहिजे असें नुसतें म्हणत आपण किती वर्षें राहणार ? नवीन उद्योगधंदे निर्माण होतात, नव्या विकास योजना अमलांत येतात, नवीन कारखाने उभारले जातात. या सर्व ठिकाणीं योग्य तीं माणसें पुरविणें कोणाचें काम आहे ? सरकार या सर्व योजना आखीत आहे पण याहिपेक्षां महत्त्वाची योजना जी मुलामुलींच्या मनाच्या योग्य अशा विकासाची आहे, ती कोण आखणार ? ती कोण अमलांत आणणार ? नवी पिढी चारित्र्यसंपन्न व्हावी, जबाबदार व्हावी, राष्ट्राचा भार पेलण्यास समर्थ व्हावी, विद्याव्यासंगाची अभिरुचि तिला लागावी यांसाठीं एखादी पंचवार्षिक योजना, एखादी दशवार्षिक योजना कोण आखणार आहे ? सत्तर पंचाहत्तर वर्षें काम करणाऱ्या खाजगी शिक्षणसंस्थांकडून अशी अपेक्षा करणें बरोबरच आहे. नाहीं तर धरणें होतील, विद्युच्छक्ति सर्व देशभर संचार करूं लागेल, कारखाने उभे राहतील, विज्ञानमंदिरें मूक निमंत्रण देऊं लागतील. कर्तृत्वाचीं नवीं क्षेत्रें निर्माण होतील आणि ज्यांच्यासाठीं हें सर्व घडावयाचें ती तरुण पिढीच भांबावलेली, अश्रद्ध आणि बेजबाबदार अशी बनली तर ? त्यांच्या मनाची योग्य ती मशागत झाली नाहीं तर साराच डाव वाया जाईल अशी भीति आज निर्माण झाली आहे. खाजगी शिक्षणसंस्थांनीं याहि बाबतींत जागरूकतेनें विचार करण्याची वेळ आली आहे.

---



अनुक्रमणिका






प्रा. अ. भि. शहा

# ग्रामदान–एक मूल्यमापन : २ :

" A utopia is a rational belief which is in the long-term interest of the holder; it is a belief, not in existing reality, but in a potential reality; *it must not violate what we know of nature,* including human nature, though it may extrapolate our present-day technology and must transcend our present social organization. " — David Riesman, *Selected Essays from Individualism Reconsidered,* p. 70

मागील लेखांत आपला शेतीविषयक प्रश्न सोडविण्यास ग्रामदान चळवळीचा कितपत उपयोग होऊं शकेल तें पाहिलें. शेतीच्या संदर्भात या चळवळीचें वैशिष्ट्य म्हणजे जमिनीवर आज असलेल्या वैयक्तिक मालकी हक्काचें विसर्जन करून समग्र गांवाचें एक कुटुंब या नात्यानें खेड्यांतील जीवनाची अहिंसक मार्गानें ग्रामोद्योगप्रधान पुनर्रचना घडवून आणावयाची तळमळ, हें होय. हें ध्येय साकार झालें तर शेतीचें उत्पादन त्यामुळें वाढेल असें समजण्यास आजतरी सबळ कारण दिसत नाहीं. आहे तो अनुभव उलट स्वरूपाचाच आहे, आणि म्हणून ग्रामदान चळवळीचें मूल्यमापन आदर्श समाज ( Utopia ) निर्माण करण्याचा एक प्रयत्न या दृष्टीनें केलें पाहिजे, असा निष्कर्ष पहिल्या लेखाच्या शेवटीं काढण्यांत आला होता.

## तात्कालिक व दूरगामी परिणाम

हें मूल्यमापन नीटपणें व्हावें म्हणून ग्रामदान चळवळींच्या केवळ बाह्य आविष्कारावर लक्ष केंद्रित न करितां तिचें वैचारिक अधिष्ठान असलेलें सर्वोदयी जीवनदर्शन तपासलें पाहिजे. कारण योग्य भाषासंज्ञा व कणखर ध्येयवाद असला तर कोणत्याहि सामाजिक चळवळीचा तात्कालिक प्रभाव फार मोठा पडूं शकतो. परंतु दूरगामी परिणाम होण्याकरितां, तिचा वैचारिक आशय काय आहे व समाजजीवनांत वेळोवेळीं निर्माण होणारे प्रश्न हाताळण्याकरितां ती कोठला मार्ग दाखविते, या गोष्टींना अधिक महत्त्व आहे. या सत्याचा विसर पडल्यामुळे राजकारणांत अनेकदां वैफल्याचे प्रसंग येतात. कम्युनिस्ट चळवळीनें या बाबतींत मोठें उद्बोधक उदाहरण घालून दिलें आहे. मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचें विश्लेषण करून इ. स. १९२० मध्यें बर्ट्रंड रसेलनें केलेलें भाकित खरें ठरलें आहे, असें अनेक कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना अनुभवाअंतीं कबूल करावें लागलें. असें होणें स्वाभाविक आहे. एकाला कार्यप्रवण करणारीं नैतिक मूल्यें व उदात्त भावना दुसऱ्याला तशींच आत्मसात् करतां येतील असें नाहीं. विचारांच्या बाबतींत हें शक्य आहे. विचार हा स्वभावतःच व्यक्तिनिरपेक्ष असल्यामुळें एकानें दिलेला विचार दुसरा स्वीकारूं शकतो, त्याचा पुढें विकास करूं शकतो व इच्छा असेल तर त्यानुसार कृतीहि करूं शकतो. हजारों मैल दूर असलेल्या इंजिनिअरानें तयार केलेल्या आराखड्यानुसार जसे आपण पूल बांधूं शकतो तसेच एका कालांत किंवा

1. Bertrand Russell – *Bolshevism : Practice and Theory.*








देशांत होऊन गेलेल्या विचारवंतानें दिलेले विचार त्याच्याबद्दल इतर कांहीं माहिती नसतांना दुसऱ्या देशकालांत राहणारे लोक आत्मसात् करूं शकतात. भावना व नैतिक मूल्यें यांच्या बाबतींत ही प्रक्रिया तितकी सोपी नसते. कारण बुद्धीपेक्षां संवेदनक्षमता फार हळूं विकास पावत असते. आणि म्हणून कोठ-ल्याहि जीवनदर्शनाचें परीक्षण करीत असतांना त्या मागील ध्येयवाद किंवा इतर उदात्त भावना यांच्यापेक्षां त्याचा वैचारिक आशय काय आहे या गोष्टीकडे अधिक बारकाईनें पाहणें आवश्यक असतें.

## सर्वोदयी दर्शन

सर्वोदयी जीवनदर्शन शंकराचार्यांच्या अद्वैतवादी तत्त्वज्ञानावर उभारलेलें आहे.[२] धर्माधिष्ठित इतर तत्त्वज्ञानानुसार हें तत्त्वज्ञानसुद्धां कर्म व वासना यांच्या बंधनांतून मुक्त होऊन ईश्वराच्या साक्षात्का-रास तें पुरुषार्थाचें सर्वोत्कृष्ट ध्येय समजतें. मनुष्याच्या भौतिक जीवनाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोण थोडासा उदासीनच असतो, व त्यामुळें इहलोकपर ( Secular ) मूल्यांना त्याच्या जीवन-दर्शनांत दुय्यम स्थान असतें. शरीराच्या व मना-च्या कांहीं मूलभूत गरजा धर्माच्या दृष्टीनें केवळ साधनेंत अडथळा म्हणून दिसतात. त्यांच्यावर संपूर्ण विजय मिळवतां आला नाहीं तरी आपद्धर्म म्हणून त्या गरजा किमान रीतीनें भागवावयाच्या व शक्य तेवढा वेळ आणि शक्ति ' अहं ब्रह्मास्मि ' या परम सत्याचा अनुभव घेण्याच्या प्रयत्नांत खर्च करावयाची, असें त्याचें प्रतिपादन आहे. जीवनाचें अंतिम मूल्य परलोकपर ( Other-worldly) असल्यामुळें व्यक्तीला व्यक्ति म्हणून प्रतिष्ठा लाभूं शकत नाहीं. सामाजिक मूल्यांनाहि ईश्वरी संकेतांची अभिव्यक्ति म्हणून किंमत राहते. अशा जीवन-दर्शनांचा आदर्शपुरुष ज्ञानाची अव्याहत उपासना करणारा एखादा आइन्स्टाईन किंवा लोककल्याणाला वाहून घेणारा एखादा आल्बर्ट श्वाइट्सर न होतां रमण महर्षि किंवा अरविंद घोष यांच्यासारखा जगद्विन्मुख संत असतो.

## मनुष्याबद्दलची एकांगी कल्पना

धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानावर उभारलेल्या जीवन-दर्शनाची मनुष्याबद्दलची कल्पनाहि एकांगी असते. शरीरापेक्षां वेगळा असा आत्मा असतो; तो आत्मा परमात्म्याचा अंश असल्यामुळें मनुष्य हा मूलतः चांगलाच असतो; त्याच्याठायीं दिसणाऱ्या दुष्प्रवृत्ती अज्ञान, पूर्वसंस्कार किंवा परिस्थितिजन्य कारणांमुळें आलेल्या असतात; योग्य रीतीनें आवाहन केलें तर दुष्ट माणसाच्याहि अंतरीं वसत असलेला देव जागा होईल व तो आपलें जीवन सुधारून सन्मार्गास लागेल, असा सिद्धान्त ओघानेंच येतो. मनुष्याच्या कांहीं मूलभूत प्रेरणा ( Instincts ) असतात; त्या प्रेरणांना योग्य वाव मिळाल्यास त्याचें व्यक्तिमत्त्व संपन्न होतें व जबाबदार नागरिक म्हणून तो आपला वांटा आनंदानें उचलतो; त्यांचें अतिदमन केल्यास त्या विकृत स्वरूपांत आपलें वर्चस्व स्थापित करतात; म्हणून मनुष्य मूलतः संपूर्णतया चांगला किंवा वाईट नसतो तर आनुवंशिक वारसा (Biological heritage) व सामाजिक आणि नैसर्गिक परिस्थिति यांचा तो परिवर्तनशील परिपाक आहे – हें शास्त्रीय सत्य या तत्त्वज्ञानाला मान्य नाहीं. परिणामीं इन्द्रिय-जन्य सुख आध्यात्मिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें हीन प्रतीचेंच नव्हे तर आभासमय सुख ठरतें. त्यांतहि कामवासना म्हणजे मनुष्याच्या अधोगतीचें सर्वांत महत्त्वाचें कारण होय. कामवासनेची योग्य तृप्ति झाल्यानें स्त्री व पुरुष या दोघांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होऊं शकतो, एवढेंच नव्हे तर मानवी संस्कृ-तीच्या अनेक सुंदर आविष्कारामागची प्रेरणा शारी-

2. " I have been nourished on the work and teachings of Shri Shankaracharya. "– Vinoba, Bhoodan II 6, p. 2.

रिक आकर्षण आहे, हें प्रमेय धर्माधिष्ठित जीवन-दर्शनाला मान्य नाहीं.

ऋग्वेदांतील पुरूरवा–उर्वशी संवाद, मीराबाईची कांहीं भजनें, वेरूळ व भुवनेश्वर येथील शिल्प, इत्यादि कलाकृतींकडे पाहिलें कीं कामदेवाचें साम्राज्य धर्माच्या क्षेत्रांत कसें पसरलेलें आहे, हें स्पष्ट होतें. धार्मिक भावना व कामवृत्ती यांमध्यें फार जवळचा संबंध आहे[3], परंतु तो संबंध न ओळखल्यामुळें अनेकदां मानसिक विकृतीलाहि आपण उच्च कोटीचा आध्यात्मिक गुण समजून तिचा गौरव करीत असतो.

जी गोष्ट कामवासनेची तीच गोष्ट मनुष्याच्या इतर नैसर्गिक प्रवृत्ती व सर्जनशीलतेची आहे. धर्माधिष्ठित जीवनदर्शनांत त्यांचें स्थान ईश्वरसाधनेच्या अनुषंगानें ठरविलें जातें. यामुळें कला व संस्कृति यांचा विकास एका विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे होऊं शकत नाहीं. साधेपणाला स्वयंसिद्ध मूल्य समजल्यानें केवळ भौतिक जीवनांतच नव्हे तर सांस्कृतिक जीवनांतहि एका प्रकारचा 'तोच तो' पणा येतो, व तुंबलेल्या पाण्याप्रमाणें त्यांतील चेतनाहि कमी होते.

### आर्थिक व राजकीय उपाय अव्यवहार्य.

वैयक्तिक जीवनविषयक सर्वोदयी जीवनदर्शनाचे सिद्धान्त जसे एकांगी व अवास्तववादी आहेत तसेच आर्थिक व राजकीय प्रश्नांवर त्यानें सुचविलेले उपाय अव्यवहार्य आहेत. आजच्या युगाचीं कांहीं व्यवच्छेदक लक्षणें म्हणजे – यंत्रविद्येला आलेलें स्थायी महत्त्व, मोठमोठ्या जनसमूहांचे परस्पर गुंतले गेलेले हितसंबंध व त्यामुळें शासनसंस्थेला आलेलें सर्वव्यापी अभूतपूर्व महत्त्व, सर्वसामान्य मनुष्याला समतेची व आर्थिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या समृद्ध जीवन जगण्याची उत्पन्न झालेली दुर्दम्य आकांक्षा, व ही आकांक्षा वाढत्या प्रजासंख्येच्या संदर्भात पूर्ण करण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या नियोजनामुळें व्यक्तिस्वातंत्र्याला उत्पन्न झालेला धोका – अशीं दाखवितां येतील. या समस्या सोडवायच्या असतील तर अगोदर त्यांचें अस्तित्व मान्य केलें पाहिजे. सर्वोदयी जीवनदर्शनांत कांहींचें अस्तित्व मान्य करण्यांत येत नाहीं. उदाहरणार्थ, वाढत्या प्रजासंख्येचा प्रश्न कृत्रिम असून मनुष्याच्या स्वकेंद्रित वृत्तीच्या बाहेर त्याला वास्तवतेचें अधिष्ठान नाहीं, असें तें मानतें. प्रजासंख्येच्या प्रश्नाचें अस्तित्वच नाकारल्यामुळें संततिनियमनाच्या उपायांची गरज उरत नाहीं, हें उघड आहे. आर्थिक, राजकीय व सामाजिक असमानता नष्ट झाली पाहिजे असें विनोबा म्हणतात, परंतु त्याकरितां त्यांनीं सुचविलेले उपाय परिणामकारक होतील असें समजावयास कारण दिसत नाहीं. उत्पादनसाधनांची मालकी सामाजिक केल्यानें शोषणाचा प्रश्न सुटेलच या म्हणण्यास कम्युनिस्ट देशांचा अनुभव पुष्टि देत नाहीं. किंबहुना सांस्कृतिकदृष्ट्या मागास-

---

3. " There exists a close connection between mystic ideas and erotic ideas, and most often these two orders of conception are associated in insanity. " – Re'gis, quoted by Havelock Ellis in *Studies in the Psychology of Sex*, Vol I, Part 1, p. 314

" It is a noteworthy and significant fact that the age of love is also the age of conversion. "– Havelock Ellis, *Ibid.* p. 310

" ... the suppression of the sexual emotions often furnishes a powerful reservoir of energy to the religious emotions; occasionally the suppressed sexual emotions break through all obstacles " – *Ibid.* p. 325.





अनुक्रमणिका

लेल्या, व्यक्तिस्वातंत्र्याची परंपरा नसलेल्या आणि 'पंच हेच परमेश्वर' असें समजणाऱ्या समाजांत व्यक्तीला उपजीविकेकरितां समष्टीवर संपूर्णतया अवलंबून राहावें लागलें तर तिला कोठल्याहि प्रकारच्या स्वातंत्र्याची खात्री बाळगतां येणार नाहीं. कारण, उत्पादनसाधनांचें समाजीकरण म्हणजे शेवटीं त्याच्या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या कांहीं व्यक्तींची सत्ता, एवढाच अर्थ होण्याचा संभव असतो. विनोबा सुचवित आहेत तशीं स्वयंपूर्ण खेडीं अस्तित्वांत आलीं तर ही भीति अधिकच बळावेल. दिल्लीहून राज्य करणाऱ्यांच्या अनेक चुका होत असतील, परंतु त्यांच्या ठिकाणची व्यक्तिनिरपेक्ष विचार करून निर्णय घेण्यास लागणारी बुद्धिमत्ता व निस्पृहता खेड्यांतील स्थानिक नेतृगणापेक्षां केव्हांहि जास्त प्रमाणांत आढळणार, हें मान्य करावयास हरकत नसावी.

## आपला प्रश्न अधिक गुंतागुंतीचा

याचा अर्थ असा नव्हे कीं केंद्रीय सत्तेचें वर्चस्व अमर्यादित असावें. आपल्याकडील प्रश्न पाश्चात्य देशांपेक्षां अधिक गुंतागुंतीचा आहे. त्यांच्याकडे व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास झाला तो त्यांच्या आर्थिक भरभराटीच्या काळांत. लोकशाही परंपरा रुजविण्यास त्यांना जवळ जवळ दोन शतकें मिळालीं, व त्यामुळें तेथील खेडीं आणि शहरें यांतील सांस्कृतिक अंतर आपल्या मानानें बरेंच कमी आहे. म्हणून त्यांच्याकडे आज सत्तेचें संपूर्ण विकेंद्रीकरण केलें तरी नुकसान होण्यापेक्षां फायदा होण्याचाच संभव अधिक आहे. आपल्या ग्रामीण जीवनाची पातळी लक्षांत घेतली कीं, अशा विकेंद्रीकरणाचा धोका स्पष्ट होईल. म्हणूनच कै. डॉ. आंबेडकर खेड्याला एकम म्हणून घेण्यास तयार नव्हते. कारण आजच्या परिस्थितींत पंडित नेहरूंची सत्ता खेड्यापुरती खेड्यांतील पुढाऱ्याला दिली तर पंडितजींच्या चुकांबरोबर तो स्वतःच्याहि चुका व गुन्हे करील, याबद्दल प्रस्तुत लेखकाला तरी शंका नाहीं.

खरी गोष्ट अशी आहे कीं, आपल्या किंवा तत्सम देशांतील सत्तेच्या स्वभावपालटाचा प्रश्न अल्पकाळांत सुटण्यासारखा नाहीं. सत्तेची कार्यक्षमता अबाधित ठेवून तिची स्वातंत्र्यविध्वंसक वृत्ति काबूत आणण्याकरितां सर्वसामान्य नागरिकाची सांस्कृतिक पातळी वाढविण्याशिवाय दुसरा कायम स्वरूपाचा उपाय नाहीं. हें कार्य करण्यास कांहीं दशकें तरी लागणार. आज आपण त्या दिशेनें केवळ पहिलें पाऊल टाकूं शकलों तरी पुरे. परंतु हें पहिलें पाऊल कसें टाकावयाचें हा प्रश्न आपल्या राजनीतीचा यक्षप्रश्न आहे. केवळ भौगोलिक विकेंद्रीकरणानें ही समस्या सुटणार नाहीं, हें वर सुचविलेंच आहे. सत्तेच्या भौगोलिक विकेंद्रीकरणाबरोबरच तिच्या वेगवेगळ्या स्वरूपांची एकमेकापासून फारकत केली पाहिजे. तसें न केल्यास एकच व्यक्तिसमूह जीवनाच्या सर्वक्षेत्रांवर कायद्यानें मर्यादित परंतु वास्तवांत अनियंत्रित सत्ता गाजवूं शकेल, आणि लोकशाही परंपरेच्या अभावांत आधुनिक यंत्रविद्येच्या साहाय्यानें व्यक्तिस्वातंत्र्याचा लोप होण्यास फार वेळ लागणार नाहीं.

## शासनसंस्थेचें कार्य

विकेंद्रीकरणाची प्रक्रिया निश्चयानें परंतु सावधगिरीनें सुरू होणें आवश्यक आहे. ही प्रक्रिया फलदायी व्हावयाची असेल तर त्यांत शासनसंस्थेला फार महत्त्वाचा वांटा उचलावा लागेल. दुसरें असें कीं, शासनसंस्थेची जबाबदारी केवळ विकेंद्रीकरण घडवून आणण्यापुरती नाहीं. विकेंद्रित समाजव्यवस्थेंतसुद्धां देशव्यापी महत्त्वाचे कांहीं प्रश्न राहणारच, आणि हे प्रश्न संरक्षण, आंतरराष्ट्रीय व्यापार, इत्यादि आज सहज लक्षांत येणाऱ्यापैकींच असतील असें नाहीं. घटक-प्रदेशांत वेळोवेळीं निर्माण होणारे हितसंघर्ष मिटविण्यास व

तें करीत असलेल्या विधायक प्रयत्नांत सहकार व एकसूत्रीपणा ( Co-ordination ) निर्माण करण्यांत शासनसंस्थेला महत्त्वाचें कार्य करावें लागणार आहे. म्हणून शासनसंस्थेचें कर्तव्य (Role) कोठल्या तरी एका वर्गाचें समाजावर वर्चस्व ठेवण्यापुरतें किंवा कायदा आणि व्यवस्थेचें संरक्षण करण्यापुरतें नकारात्मक नाहीं. परंतु सर्वोदयी जीवनदर्शनांत शासनसंस्थेला स्थान नाहीं; त्याचें ध्येय आहे शासनमुक्त समाज निर्माण करावयाचें. शासनसंस्थेला नकारात्मक नाहीं असें कर्तव्य (Positive function ) च नसल्यामुळ तिचें सर्वस्वरूप कुचकामी व व्यक्तिस्वातंत्र्याला बाधक आहे असें सर्वोदयी जीवनदर्शन सांगतें. व्यक्तिव्यक्तिमधील मतभेद व्यक्तिस्वातंत्र्याला बाध न येऊं देतां कसे मिटविणार, अशी शंका उपस्थित झाली तर तिला उत्तर असें आहे कीं, सर्व निर्णय एकमतानें घेतले जावेत, अशी तरतूद केली म्हणजे झालें. निव्वळ तार्किकदृष्ट्या हें उत्तर समाधानकारक आहे असें मान्य करूनहि असें वाटतें कीं, अशी तरतूद केली तरी ती कागदावरच राहण्याचा संभव अधिक असतो. आणि तसें नाहीं झालें तर कोठलाहि महत्त्वाचा निर्णय घेणें जवळजवळ अशक्य होऊन बसेल. येथें मनुष्याच्या चांगुलपणाचा प्रश्न नाहीं. प्रामाणिक मतभेदामुळेंच ही अडचण येण्याचा संभव अधिक आहे.

## अभिप्रेत अर्थव्यवस्था

प्रत्यक्ष कृतीच्या दृष्टीनें या सर्व गोष्टींपेक्षां सर्वोदयी जीवनदर्शनाला अभिप्रेत असलेली अर्थव्यवस्था जास्त महत्त्वाची आहे. औद्योगिक क्रांतीचे दुष्परिणाम टाळण्याकरितां सर्वोदयी समाज आर्थिकदृष्ट्या ग्रामोद्योगप्रधान राहिला पाहिजे, असा विनोबांचा आग्रह आहे. युरोप-अमेरिकेंतील जनतेला औद्योगीकरणाचे आलेले अनुभव त्या प्रक्रियेचे अनिवार्य परिणाम आहेत, असें नाहीं. मनुष्य दुसऱ्यांच्या अनुभवावरून शिकूं शकतो, व म्हणून आज आर्थिक दृष्ट्या मागासलेले देश अंध औद्योगीकरणाचे धोके टाळून आपला आर्थिक विकास साधूं शकतात. तसा एक महान् प्रयोग या देशांत चाललाहि आहे. त्यांत दोष नाहींत असें म्हणावयाचें नाहीं; परंतु दीडशें वर्षापूर्वी युरोपमध्यें अशा परिस्थितींत घडलेले बरेच अनिष्ट प्रकार येथें घडत नाहींत, हें सुद्धां एक महत्त्वाचें सत्य आहे. दुसरें असें कीं, ग्रामोद्योगप्रधान व प्रमुख आर्थिक गरजा ( अन्न, वस्त्र, निवारा, इत्यादि ) यांच्या बाबतींत स्वयंपूर्ण खेड्यांची कल्पना अव्यवहार्य आहे. भारताचे कांहीं भाग असे आहेत कीं, ते वर उल्लेखिलेल्या कांहीं गोष्टींच्या बाबतींत स्वयंपूर्ण होऊं शकणारच नाहींत, व तशा स्वयंपूर्णतेची अर्थशास्त्रदृष्ट्या गरजहि नाहीं. एखाद्या प्रदेशानें स्वयंपूर्णतेचा आग्रहच धरला तर तिकडील सर्वसामान्य माणसाचें जीवनमान फार खालच्या पातळीवर राहील. सहकाराच्या भावनेवर उभारलेल्या समाजव्यवस्थेंत आर्थिक स्वयंपूर्णतेवर भर देणें म्हणजे आर्थिक गोष्टींना अवास्तव महत्त्व देण्यासारखें आहे. सांस्कृतिक विकासाकरितां भौतिक गरजा शक्य तितक्या कमी करणें आवश्यक नसून त्या भागविण्याच्या काळजींतून व्यक्तीला मुक्त करण्याची आवश्यकता आहे.

सर्वोदयी जीवनदर्शन मनुष्याला जरी मूलतः संपूर्णतया चांगला समजत असलें तरी मनुष्यस्वभावाबद्दल त्याचें मत फार चांगलें आहे असें वाटत नाहीं. कारण त्याचें प्रतिपादन असें आहे कीं, ययाति राजाच्या कामवासनेसारख्या मनुष्याच्या भौतिक गरजा अमर्याद विकासशील आहेत व म्हणून त्यांचें संपूर्ण समाधान होऊन सांस्कृतिक विकासाला अनुकूल मनोवृत्ति राहील, असें समजणें व्यर्थ आहे. कांहीं व्यक्तींच्याबद्दल हें निराशाजनक विधान खरें आहे; परंतु याचें विरोधी ( con-








trary ) विधानहि कांहीं व्यक्तींच्या बाबतींत खरें आहे – भौतिक गरजा किमान रीत्या भागवूनहि त्यांचा सांस्कृतिक विकास होऊं शकतो. या दोनपैकीं एकहि विधान बहुसंख्य माणसांना लागूं पडत नाहीं. कोठल्याहि संस्कृतीचा इतिहास पाहिला कीं, असें दिसून येतें कीं, आर्थिक विवंचनेतून मुक्त झाल्यावर सर्वसामान्य मनुष्य अधिकाधिक चैनीच्या मार्गे न जातां आपल्या कुवतीनुसार सांस्कृतिक विकास साधण्याचा प्रयत्न करतो.

परंतु हें सगळें खरें नसलें तरी तीनशें वर्षापूर्वी असलेल्या काळांत परत जावें, असें सर्वोदयी मंडळीसुद्धां म्हणणार नाहीं; व तसें करणें शक्य नाहीं. ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्थेंत यंत्राला मर्यादित वाव आहे. एकदां लहान यंत्राला स्थान दिलें कीं, मोठी यंत्रें आपोआपच येणार, कारण लहान यंत्रांच्या उत्पादनासाठीं यंत्रोत्पादक कारखान्यांची जरूर असते. उदाहरणार्थ, शेतजमिनीला पाणी पुरवठ्याकरितां डिझेल इंजिनें पाहिजेत असें मान्य केलें कीं, इंजिनें तयार करण्याचे कारखाने, तेल कारखाने, कोळशाच्या खाणी किंवा विद्युतोत्पादनाचा उद्योग, इत्यादि अनेक प्रकार ओघानेंच येतात. दुसरें असें कीं, आज असलेलें मोठमोठाले उद्योगधंदे–कोळसा, लोखंड व पोलाद, सिमेंट, कापड, साखर, रेल्वे, मोटार वाहतूक, इत्यादि –आपल्या जीवनाचे असे अविभाज्य घटक होऊन सहज रीत्या बसले आहेत कीं स्वयंपूर्ण ग्रामोद्योगप्रधान समाजाचीं स्वप्नें सहज रंगवितांना आपल्याला त्यांची वेगळी अशी आठवणहि होत नाहीं. हे उद्योगधंदे आपण टाकून देऊं शकणार नाहीं, आणि समजा ध्येयवादाचा एखादा भयंकर झटका येऊन आपण तसें करूं शकलों तर या देशाचें जीवनमान अकल्पनीय प्रमाणांत खालीं जाईल.[४] जोंपर्यंत हे मोठमोठाले उद्योग अस्तित्वांत आहेत तोपर्यंत ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्था खऱ्या अर्थानें अस्तित्वांत येऊं शकत नाहीं.

## महत्त्वाचा अंतर्विरोध

एवढेंच नव्हे तर ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्थेंत एक महत्त्वाचा अंतर्विरोध आहे – व तो असा कीं, ही अर्थव्यवस्था मोठ्या उद्योगांच्या साहाय्याशिवाय टिकाव धरूं शकणार नाहीं. उदाहरणार्थ, अंबर चरखा घेऊं. प्रा. वि. म. दांडेकर यांनीं दाखविल्यानुसार[५] इ. स. १९६०–६१ पर्यंत ३० लाख अंबर चरखे कामांत आणण्याकरितां भांडवली खर्च रु. ४० कोटि येईल आणि कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत मदत ( Subsidy ) म्हणून दरवर्षी रु. ७५ कोटि खर्च येईल. या तीस लाख अंबर चरख्यांमुळें सुमारें चव्वेचाळीस लाख लोकांना दिवसा बारा आणे या हिशोबानें रोजगार मिळेल. आज बेकार असलेल्यांना स्वाभिमानानें आपल्या श्रमावर जगतां यावें म्हणून असा खर्च करण्यांस हरकत नाहीं. प्रश्न आहे तो असा कीं, मोठ्या उद्योगधंद्यांतून मिळणारा नफा उद्यां बंद झाला तर ही मदत येणार कोठून ?

---

४. इ. स. १९५५–५६ या वर्षांत भारताचें राष्ट्रीय उत्पन्न खालीलप्रमाणें होतें:—

| | |
|---|---|
| शेती, दूधदुभतें, इत्यादि | रु. ४९८० कोटि. |
| खाणीं, कारखाने व लहान उद्योग | रु. १७५० कोटि. |
| व्यापार व वाहतूक | रु. १९७० कोटि. |
| इतर सर्व्हिसेस ( Services ) | रु. १७२० कोटि. |
| | एकूण रु. १०४२० कोटि. |

5. V. M. Dandekar— *Rationale of the Ambar Charkha*, in the *Economic Weekly*, July 6, 1957, pp. 863-67

यावर असें उत्तर देतां येईल कीं, तशी मदत नसली तर ग्रामोद्योगप्रधान अर्थव्यवस्थेला तात्त्विक बाध येत नाहीं. हें खरें आहे. परंतु या लेखाच्या सुरुवातीस उद्धृत केलेलें डेविड रीझमन् यांचें वचन लक्षांत ठेवलें पाहिजे. ज्या आदर्श समाजाची रचना मनुष्यस्वभावाचे मूलभूत गुण लक्षांत घेत नाहीं तो समाज अस्तित्वांत येऊं शकणार नाहीं — आलाच तर स्वतंत्र मानवांचा समाज म्हणून दीर्घ काळ राहणार नाहीं. एके काळीं ग्रामोद्योगप्रधान व आर्थिकदृष्ट्या जवळ जवळ स्वयंपूर्ण खेडीं अस्तित्वांत होतीं, हें विसरून चालणार नाहीं. मानवी समाजांत निर्माण झालेल्या, अंध कां असेनात, परंतु स्वयंस्फूर्त सर्जनशक्तींच्या विकासामुळेंच ती समाजव्यवस्था लोप पावत गेली आहे. उद्यांच्या आदर्श समाजाचें चित्र रंगवितांना मनुष्याची सर्जनशीलता, त्याच्या मूलभूत भौतिक व आधिभौतिक प्रेरणा व व्यक्ति आणि समाजाचा घटक म्हणून त्याच्या स्वभावांतील गुणदोष, या गोष्टींना त्यांत खंत न बाळगतां ( ungrudgingly ) स्थान दिलें पाहिजे. सर्वोदयी जीवनदर्शनांत तसें झालेलें दिसत नाहीं.

### ज्ञान व सद्भावना यांची गफलत

असें कां व्हावें हा विचाराचा प्रश्न आहे. एक कारण असें वाटतें कीं, सर्वोदयांत ज्ञान व सद्भावना यांची गफलत झाली आहे. उदाहरणार्थ, शरीरशास्त्र व मानसशास्त्र यांनीं मनुष्याच्या संबंधीं शोधून काढलेल्या सिद्धांताची त्यांत दखल घेतलेली नाहीं. तशी दखल घेतली असती तर कामवासनेचें सर्जनशील स्वरूप त्यानें मान्य केलें असतें[6], व एक मूल झाल्यानंतर प्रसूतिवेदनांचा अनुभव आल्यामुळें स्त्रीच्या कामवासनेला ओहोटी येत असेल, असें विनोबा म्हणाले नसते.[7] उत्क्रांतिवादाचा आचार्य दादा धर्माधिकारी यांनीं सर्वोदय – दर्शन या पुस्तकांत लावलेला अर्थ साफ चुकीचा आहे. तीच गोष्ट आधुनिक पदार्थविज्ञानांतून निघणाऱ्या तत्त्वज्ञानविषयक निष्कर्षाबद्दल त्यांनीं केलेल्या विधानाची आहे.

पाश्चात्य देशांत आधुनिक संस्कृतिविरुद्ध होणारी प्रतिक्रिया गेल्या शंभर वर्षांत त्यांना आलेल्या अनुभवांतून निर्माण झाली आहे, व म्हणून त्यांची प्रतिक्रिया चुकीची असली तरी एका अर्थानें ती खरी ( Authentic ) आहे. आपल्याकडे आधुनिकतेला होणारा विरोध जुन्या संस्कृतीचा मृत्युविलाप आहे, असें वाटतें. हा फरक पाश्चात्य व पौर्वात्य देशांत होणाऱ्या आधुनिक संस्कृतीवर होणाऱ्या टीकेंतसुद्धां दिसून येतो. समाजवाद, मार्क्सवाद, पक्षीय राजकारण, यंत्रविद्या इत्यादिवर टीका करतांना तिकडील विचारवंत आधुनिक अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, मानसशास्त्र, विज्ञान, इत्यादि शास्त्रांनीं उपलब्ध करून दिलेलें ज्ञान गृहीत धरून बोलतात. या उलट आपल्याकडे सर्वसाधारण समज असा दिसतो कीं, कांहीं नीतिमूल्यें मान्य केलीं व तीं कृतींत उतरावयाचा मनापासून प्रयत्न केला कीं, ज्ञानाची —

---

6. " Spiritual ' procreation ' is just as much the work of Eros as is corporeal procreation, and the right and true order of the Polis is just as much an erotic one as is the right and true order of love. The culture-building power of Eros *is* non-repressive sublimation; sexuality is neither deflected from nor blocked in its objective ; rather in attaining its objective, it transcends it to others, searching for fuller gratification. " — Herbert Marcuse, *Eros and Civilization*, p. 211

७. विनोबा – दीक्षा, पा. २२०.







आणि ती ' पुस्तकी ' ज्ञानाची — गरज नाहीं. ही गोष्ट केवळ सर्वोदयवाद्यांची आहे, असें नाहीं. हा आपल्या सामाजिक जीवनाचाच मोठा दोष आहे. उदाहरणार्थ, कांहीं दिवसापूर्वी महाविद्यालयीन शिक्षणावर बोलतांना, महाराष्ट्राच्या राजकीय जीवनांत अत्युच्च स्थान असलेल्या व प्रजासमाजवादी पक्षाचे एक अध्वर्यु असलेल्या अशा व्यक्तीनें सांगितलें कीं, " प्राध्यापकानें एकदोन ग्रंथ कमी वाचले तरी चालेल, त्यानें विद्यार्थ्यांचा जीवनग्रंथ वाचला म्हणजे पुरे. " या परिस्थितीला आपली सांस्कृतिक परंपरा बऱ्याच अंशीं जबाबदार आहे. धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानांत ' ज्ञान ' या संज्ञेला विज्ञानांत असतो त्यापेक्षां अगदीं वेगळा अर्थ असतो. अशा तत्त्वज्ञानांत ज्ञान म्हणजे सद्गुण व स्थितप्रज्ञत्व असें समीकरण लावण्यांत येतें. असें ज्ञान दुसऱ्यांना देतां येत नाहीं; तें मिळविण्याचा मार्ग तपस्येचा आहे. या परंपरेंत ज्ञान व नीतिमत्ता यांची गफलत झाली तर त्यांत आश्चर्य नाहीं.

आधुनिक शास्त्रांनीं उपलब्ध करून दिलेल्या ज्ञानाशीं विसंगत असलेलीं तत्त्वें सर्वोदयी जीवनदर्शनांतून सोडून दिलीं तर वैचारिक आशय म्हणून फार थोडें उरतें. उरतें केवळ राग, लोभ, काम, क्रोध, इत्यादि षड्रिपूंच्या बंधनांतून मुक्त झालेल्या सद्गुणी माणसांच्या समाजाचें चित्र. हें चित्र वास्तवांत उतरविणें अशक्य आहे, उतरविण्यासारखेंहि नाहीं. त्याची तुलना इतर आदर्श समाजचित्रांशीं न करतां त्यांच्या वास्तव प्रतिकृतींशीं केली जाते, व आज प्रचलित असलेल्या इतर जीवनदर्शनांपेक्षां सर्वोदयी जीवनदर्शन श्रेष्ठ आहे, असें प्रतिपादन केलें जातें. अशी तुलना चुकीची होय. तुलना होऊं शकेल दोन स्वप्नांची किंवा दोन वास्तव गोष्टींची, एक स्वप्न व एक वास्तव गोष्ट यांची नाहीं. सर्वोदयी समाज आज कोठेंहि अस्तित्वांत नसल्या कारणानें सध्यां तरी दोन जीवनदर्शनांचीच तुलना करणें भाग आहे. तसें केल्यास लोकशाही जीवनदर्शन केव्हांहि श्रेष्ठ ठरेल, असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. कारण लोकशाही जीवनदर्शन आधुनिक ज्ञानाची दखल घेतें एवढेंच नव्हे तर तें त्यावर उभारलें असल्यामुळें नेहमीं विकासशील असतें. त्यांत मनुष्याला देव किंवा दानव न समजतां मनुष्यच समजला आहे, व मनुष्य म्हणून त्याच्याठायीं असणाऱ्या प्रेरणा आणि सर्जनशक्तींचा असलेल्या परिस्थितींत जास्तींतजास्त विकास आणि व्यक्तिव्यक्तींमध्यें संवादित्व कसें निर्माण करावयाचें; या प्रश्नाचें उत्तर मनुष्यस्वभाव लक्षांत घेऊन दिलेलें आहे.

### ग्रामदान आंदोलनाच्या मर्यादा व त्यांचें कार्य

प्रा. ध. रा. गाडगीळ म्हणतात कीं, विनोबा म्हणजे खराखुऱ्या अर्थानें आधुनिक व अखिल भारतीय स्वरूपाची अशी विचारसरणी (" a genuine modern, all–India ideology")[8] निर्माण करणारी सर्वांत अधिक प्रभावी शक्ति आहे. प्रा. गाडगीळ यांच्या चिकित्सक बुद्धीबद्दल नितांत आदर असून त्यांचें हें विधान पटण्यासारखें नाहीं. विनोबांची चळवळ अखिल भारतीय असेल — नसल्यास उद्या होईल — परंतु त्यांचें जीवनदर्शन आधुनिकत्वाच्या निकषावर उतरूं शकेल असें वाटत नाहीं. कारण व्यक्तिस्वातंत्र्य व भौतिक आणि सांस्कृतिक संपन्नता या दुहेरी ध्येयाच्या दृष्टीनें आधुनिक भारताचा कोठलाहि प्रश्न सोडविण्यास सर्वोदयी जीवनदर्शनाचा उपयोग होण्यासारखा नाहीं. त्याचा अर्थ असा नव्हे कीं, ग्रामदान चळवळीचाहि कांहीं उपयोग होऊं शकणार नाहीं. या चळवळीला आतांपर्यंत यशाचें श्रेय

8. D. R. Gadgil —*Emotional Integration of India*, *QUEST*, III 2, p. 44








जितकें विनोबांच्या प्रभावी व कारुण्यपूर्ण व्यक्तिमत्त्वाला आहे तितकेंच सरकार व राजकीय पक्षांच्या दिवाळखोरीला आहे. कॉंग्रेसपासून कम्युनिस्टांपर्यंत सर्व पक्षांनीं विनोबांच्या छत्राखालीं एकत्र जमावें यांत त्यांची लोकहिताची तळमळ असेल याबद्दल शंका नाहीं. परंतु त्याचबरोबर त्यांचें बौद्धिक दारिद्र्य आणि राजकीय संधिसाधूपणाहि असण्याचा फार मोठा संभव आहे. ही जाणीव राजकीय नेत्यांना झाली तर तें चांगलेंच आहे. दुसरें असें कीं, ग्रामदान चळवळीमुळें आतापर्यंत "मायबाप" सरकारवर विसंबून बसणारी या देशांतील जनता आपले प्रश्न आपणच सोडवूं शकूं – किमान आपण प्रयत्न तरी केला पाहिजे – अशा विचारानें प्रेरित होऊन आत्मविश्वासानें कार्यप्रवण झाली तर तेंहि बाल्यावस्थेंत असलेल्या लोकशाहीला हवेंच आहे. तिसरें असें कीं, ग्रामदान चळवळीमुळें खेड्यांत काम करणारा व ध्येयवाद आणि तांत्रिक ज्ञान यांनीं युक्त असा कार्यकर्त्यांचा एक वर्ग तयार होण्याचीं आशा आहे. या वर्गानें खेड्यांतील जीवनाची पुनर्रचना करण्याचे प्रयोग केले तर त्यांचा अनुभव पुढील विकासाची दिशा आंखताना फार महत्त्वाचा ठरेल यांत शंका नाहीं.

—





अनुक्रमणिका








डॉ. ग. ना. जोशी

# ' आचार्य जावडेकर यांचें समन्वयाचें तत्त्वज्ञान '

## —कांहीं शंका व विचार.

आचार्य जावडेकर यांच्या द्वितीय पुण्यतिथि-निमित्त ८,९ व १० डिसेंबर १९५७ रोजीं पुण्यांत प्रा. दि. के. बेडेकर यांनीं केलेल्या तीन भाषणांचा गोषवारा 'नवभारत'च्या फेब्रुवारी १९५८ च्या अंकांत प्रसिद्ध झालेला आहे. आचार्य जावडे-करांच्या विचारांचें अत्यंत काळजीपूर्वकपणें दोहन करून त्यांचें जीवनतत्त्वज्ञान प्रा. बेडेकरांनीं या व्याख्यानांच्या रूपानें थोडक्यांत मांडून वाचकांना उपकृत केलें आहे यांत शंका नाहीं. आचार्यांची मूळ वैचारिक बैठक कोणती आहे, व त्यांची एकूण जीवनदृष्टि कोणत्या प्रकारची आहे हें प्रा. बेडे-करांनीं स्पष्टपणें व सुबोधपणें मांडल्यानें अभ्यासूंची बरीच सोय होणार आहे. परंतु प्रा. बेडेकरांनीं आचार्यांच्या विचारांची साक्षेपीपणानें जितकी चिकित्सा करावयास पाहिजे होती तितकी मात्र या त्यांच्या व्याख्यानांतून होऊं शकली नाहीं. त्याला कारणें कांहींहि असलीं तरी चिकित्सक पद्धतीनें आचार्यांच्या विचारांचें व जीवनतत्त्वज्ञानाचें विवे-चन व्हावयास हवें होतें, असें वाटल्याशिवाय राहात नाहीं. प्रा. बेडेकरांच्या मनांत तें करण्याचें आहे व, तसें ते पुढें केव्हांतरी करतील अशी आशा त्यांनीं व्यक्त केली आहे, ही मात्र समाधानाची गोष्ट आहे.

खुद्द आचार्य जावडेकर हे फार मोठे विचारवंत होते. आपलें सर्व आयुष्य त्यांनीं विचारांची उपा-सना करण्यांत व सत्याचा शोध करण्यांत घालविलें असल्यानें त्यांचा अधिकारहि मोठा होता. त्यांची दृष्टि व्यापक, संग्राहक, सहिष्णु, सत्यशोधक व चिकित्सक असल्यानें त्यांनीं जीवनाचा विविध भूमिकांवरून विचार करून निर्दोष व व्यापक असें जीवनदर्शन घडविण्याचा केलेला प्रयत्न महान् व अद्वितीय तर खराच. श्री. अरविंदांनीं ज्याप्रमाणें तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत पाश्चिमात्य व पौर्वात्य, आणि प्राचीन व अर्वाचीन विचारांचा चिकित्सक पद्धतीनें अभ्यास व विचार करून त्या सर्वांच्या समन्वयां-तून जसें एक नवीन समन्वयात्मक तत्त्वज्ञान आपल्या काळासाठीं निर्माण केलें तसेंच एक सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञान सर्वसामान्य माण-साच्या व्यावहारिक व सामाजिक जीवनासाठीं तयार करण्याचा प्रा. बेडेकर म्हणतात तसा भगीरथ प्रयत्न आचार्यांनीं केलेला आहे, व त्याबद्दल केवळ महाराष्ट्रच नव्हे, तर अखिल भारत आचार्यांना कृतज्ञ राहावा यांत नवल नाहीं.

आचार्यांचें लिखाण मला फार आवडत आलेलें आहे व त्यांच्या विचारांचा शक्य तेवढ्या आस्थेनें मी माझ्यां परीनें अभ्यास करण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यांच्या विचारांचा व्यक्तिशः माझ्या मनावर व विचारसरणीवर खूपच प्रभाव पडलेला आहे. तरी पण त्यांचें लिखाण वाचत असतांना व त्यांच्या भव्य व विशाल समन्वयदृष्टीचें कौतुक वाटत असतांना त्यांच्या विचाराच्या कांहीं भागासंबंधीं वेळोवेळीं कांहीं शंका माझ्या मनांत डोकावत आल्या आहेत. या निमित्तानें त्या शंका अत्यंत नम्रपणें आज मी येथें व्यक्त करीत आहे व यांत इच्छा एवढीच आहे कीं, आचार्यांच्या विचारांचें यथार्थपणें मला आकलन होण्यास व मूल्यमापन करण्यास मदत व्हावी. समन्वयाच्या दृष्टीनें ज्यांनीं या समस्यांचा खूप विचार केलेला आहे, अशा अधिकारी व्यक्तींनीं या समस्यांवर कांहीं प्रकाश



अनुक्रमणिका






टाकला तर अर्थातच त्यामुळें माझ्या शंकांचें निरसन होण्यास मदत होईल व म्हणून मला आनंद होईल.

### समन्वय म्हणजे काय ?

आचार्यांनीं आपल्या तत्त्वज्ञानांत प्राचीन व आधुनिक आदर्श व वास्तव, धर्म व व्यवहार, अध्यात्म व सामाजिक भौतिक जीवन, पौर्वात्य व पश्चिमात्य, श्रद्धावाद व बुद्धिवाद, अध्यात्म व विज्ञान यांचा अनुपम समन्वय करण्याचा जो भगीरथ प्रयत्न केलेला आहे तो प्रत्यक्षांत कितपत सत्य व साकार होण्याची शक्यता आहे अशी शंका वारंवार मनांत डोकावते. त्यासाठीं प्रथमतः **'समन्वय'** म्हणजे काय, कशाकशाचा समन्वय होऊं शकतो, तो कोणत्या परिस्थितींत, कोणत्या मार्गानें व कितपत यशस्वीपणें करतां येऊं शकतो, हें निश्चित व्हावयास हवें. प्रा. बेडेकरांनीं मांडल्याप्रमाणें वरपांगी विरोधी दिसणाऱ्या द्वंद्वांतील, विचारांतील सत्यांश व सदंश एकत्र आणून व असत्यांचा त्याग करून व त्यांतील एकांगीपणा काढून टाकून त्या सत्यांशांचा मिलाफ करून व त्यांतून अधिक व्यापक व श्रेष्ठ असा एखादा विचार किंवा एखादी नवीन प्रणालि तयार करणें असा समन्वयाचा अर्थ करतां येतो. आणि आचार्यांनीं विविध जुने व प्रचलित विचार काळजीपूर्वकपणें तपासून व त्यांच्यांतील सदंश व सत्यांश सोन्याच्या कणांप्रमाणें गोळा करून एक समन्वयात्मक-दर्शन बनविण्याचा महान् प्रयत्न केलेला आहे. अर्थात् सत्य हें फार व्यापक व सर्वस्पर्शी असल्यानें विचारांतील अतिरेकीपणा काढून टाकून त्यांना शुद्ध, व्यापक, सर्वस्पर्शी व अपक्षपाती करण्यासाठीं आचार्यांनीं समन्वयाचा जो मार्ग काढला तो स्तुत्य आहे, यांत शंका नाहीं. अशा समन्वयाच्या मार्गानें व्यापक सत्याला आपण पोहोंचण्याची शक्यता अर्थातच वाढत जाते हें निःसंशय. परंतु अशा रीतीनें जरी ' समन्वय ' करण्याचा प्रयत्न केला, व तो करण्यांत तार्किक व वैचारिक दृष्ट्या जरी बरेंच यश आलें, तरी तयार केलेला असा समन्वय कृत्रिम बनून तो केवळ वैचारिक पातळीवरच सत्य ठरण्याची शक्यता नाहीं कां ? अशा तऱ्हेनें तयार केलेला समन्वय हा वास्तवांत उतरून त्याच्याप्रमाणें लोकांचें प्रत्यक्ष जीवन घडण्याची शक्यता कितपत आहे हा मूलभूत विचार आधीं व्हावयास हवा.

### सामाजिक परिस्थितीचा विचार हवा

व्यापक व तर्कशुद्ध भूमिकेवरून अनेक परस्पर-विरोधी विचारांतील सत्यांश व सदंश गोळा करून त्यांचा व्यापक समन्वय करण्याचा प्रयत्न फार तर वैचारिक पातळीवर यशस्वीपणानें करतां येऊं शकेल, परंतु त्याचा प्रत्यक्ष व वास्तविक सामाजिक जीवनांत यथार्थपणें साक्षात्कार होऊं शकेल हें कशावरून ? केवळ वैचारिक पातळीवर केलेले समन्वय प्रत्यक्षांत व वास्तवांत खरे ठरूं शकले असते तर मला वाटतें आतांपर्यंत बरेचसे कठीण प्रश्न सहज सुटूं शकले असते. सामाजिक जीवन बदलण्यासाठीं केवळ वैचारिकरीत्या समन्वय करणें व त्याप्रमाणें कृति करणें पुरेसें ठरत नाहीं. तर त्याहिपेक्षां कांहीं अधिक त्यासाठीं आवश्यक असतें; व तें म्हणजे विशिष्ट परिस्थितींत कार्य करणाऱ्या ऐतिहासिक, सामाजिक व राजकीय शक्ति कोणत्या, त्यांचें सामर्थ्य किती आहे, व त्या संकीर्ण परिस्थितीच्या चौकटींत व पार्श्वभूमीवर आपणांस हवे तसे सामाजिक बदल कितपत होऊं शकतात, ह्याचा अत्यंत खोलवर व साक्षेपी रीतीनें ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब करून विचार व्हावयास हवा. अशा तऱ्हेच्या ऐतिहासिक, पद्धतीचा अवलंब न करतां व समाजावर प्रभुत्व चालविणाऱ्या ऐतिहासिक, आर्थिक, राजकीय व धार्मिक शक्तींचें सामर्थ्य लक्षांत न घेतां जर आपण विचार करूं लागलों तर, मला वाटतें, आपणांस कोणताच समाज व त्याचें जीवन यथार्थपणें समजूं शकणार नाहीं. लोकांचें सांस्कृतिक जीवन व त्यांच्या जीवनाच्या आदर्शाविषयींच्या कल्पना












नीटपणें समजण्यासाठीं ज्या विशिष्ट ऐतिहासिक पार्श्वभूमीवर व परिस्थितींतून ते विचार व आदर्श निर्माण होऊन वाढत गेले व दृढ झाले ती ऐतिहासिक पार्श्वभूमि व सामाजिक परिस्थिति यथार्थपणें समजली पाहिजे. एखाद्या झाडाचें फूल व फळ नीटपणें समजावयाचें असलें तर त्या संपूर्ण झाडाच्या अंगाप्रत्यंगांच्या स्वरूपाचें, एकूण भौगोलिक परिस्थितीचें व ज्या जमिनींत तें झाड वाढलें त्या जमिनीचें आपणास यथार्थ ज्ञान झालें पाहिजे. त्याच पद्धतीनें कांहीं सांस्कृतिक व नैतिक मूल्यें व त्यांचें स्वरूप नीटपणें समजून घ्यावयाचें असल्यास त्यासाठीं ज्या ऐतिहासिक पार्श्वभूमींत त्यांचीं मुळें रुजलेलीं असतात, व ज्या विशिष्ट प्रकारच्या ( Peculiar ) परिस्थितींतून तीं वाढत गेलेलीं असतात त्या ऐतिहासिक परिस्थितीचें आपणांस सम्यक् आकलन व्हावयास हवें. कांहीं चांगले गुण इतर संस्कृतींत जरी दिसत असले तरी ते अलगद उचलून वाटेल तेथें नेऊन व कृत्रिम रीतीनें जोडून इतरत्र तशाच प्रकारें वाढवितां येणार नाहींत. कारण विशिष्ट ठिकाणीं तीं मूल्यें किंवा ते आदर्श वाढण्यास त्यांचें पोषण करणारी अनुकूल परिस्थिति त्यांना मिळालेली असते व त्या विशिष्ट सामाजिक–आर्थिक व राजकीय परिस्थितीच्या भूमींतून त्यांना पोसणारा जीवनरस मिळालेला असतो. त्या विशिष्ट परिस्थितींतच तीं अत्यंत सावकाशपणानें व प्रदीर्घ कालपर्यंत वाढत राहून त्यांना त्यांचें शेवटीं दिसणारें दृश्य-स्वरूप प्राप्त झालेलें असतें. परंतु त्या सांस्कृतिक मूल्यांची अखंड पार्श्वभूमि लक्षांत न घेतां तीं रोपें अलगद उचलून तीं जर त्यांना अनुकूल नसलेल्या अशा वेगळ्याच जमिनींत रोवलीं तर तीं प्रतिकूल परिस्थितींत कितपत जगूं, वाढूं व बहरूं शकतील व त्यांपासून अपेक्षित फळें कितपत मिळूं शकतील याविषयीं जबरदस्त शंका वाटते.

### वूल्फचा महत्त्वपूर्ण विचार

केवळ वैचारिक दृष्ट्या कांहीं चांगल्या गोष्टी एकत्र आणल्या म्हणजे त्या त्याच रीतीनें वास्तवांत उतरून साकार होऊं शकतील हा विश्वास श्रद्धा म्हणून ठीक आहे, पण प्रत्यक्ष समाज घडविण्यांत त्यांची यशस्वी होण्याची शक्यता फारच थोडी वाटते. कांहीं प्राणमय जीवनपद्धति सुदृढपणें जगावयाच्या व वाढावयाच्या असल्या तर त्या त्यांना अनुकूल व पोषक अशा भूमींतच उगविल्या व वाढल्या पाहिजेत, प्रतिकूल परिस्थितींत व पार्श्वभूमीवर जीवनपद्धति जगूं व वाढूं शकणार नाहींत. म्हणून कांहीं सांस्कृतिक जीवनमूल्यांचा विचार करावयाचा असला तर केवळ त्यांचाच वेगळा ( isolated ) विचार करून भागणार नाहीं, तर त्यांच्या भूमीचा, पार्श्वभूमीचा व सभोंवतालच्या परिस्थितीचा त्यांच्यांत समावेश केला पाहिजे, व त्या सर्वांचा एकत्रित विचार केला पाहिजे. या बाबतींत After the Deluge हे प्रख्यात ग्रंथ लिहून प्रसिद्धि पावलेला थोर विचारवंत Leonard Woolf नें आपल्या अलीकडील Principia Politica या ग्रंथांत लोकशाहीवर भाष्य करतांना बहुमोल विचार व्यक्त केलेले आहेत. तो म्हणतो– "Modern Democracy, which involves a relation between government and governed based upon responsibility and liberty, was not a 'System' invented by professors, of political science or even by professors of revolution. It was a form of government which developed necessarily and naturally to deal with the conditions created in European countries by the industrial and scientific revolutions and the enor-








mous increase in population." (Principia Ethical, P. 301.) वूल्फच्या मतें लोकशाहीची पद्धति कांहीं राज्यशास्त्राच्या किंवा क्रान्तीच्या प्रोफेसरांनीं मुद्दाम शोधून काढलेली नव्हती, तर विशिष्ट प्रकारच्या आर्थिक परिस्थितींतून आवश्यक झाल्यामुळें ती निसर्गतःच व अपरिहार्यपणें उगम पावली. म्हणजे ती कृत्रिमपणानें जन्माला आणलेली नाहीं. वूल्फच्या मतें विशिष्ट प्रकारच्या परिस्थितींतून त्यांच्या गरजांच्या अनुरोधानें विशिष्ट प्रकारच्या प्रणालि निसर्गतः व अपरिहार्यपणें जन्माला येत असतात. पुढें जाऊन वूल्फनें म्हटलें आहे– "Democracy, a highly dangerous political explosive, is the natural and inevitable result of ordinary persons acquiring sufficient knowledge and intelligence to think about politics. It is not chance, but the logic of events which has made modern democracy contemporary and concomitant with the progress of the industrial and scientific revolution and with the education of masses... Democracy is not, as we are often now told, a 'mere word'; it has not 'lost its meaning;' it is a natural secretion of any society in which men acquire the ability to think for themselves" (Ibid. p.303.) म्हणजे शिक्षणाचा फायदा सर्वसामान्य नागरिकास मिळाल्यामुळें व औद्योगिक व वैज्ञानिक क्रान्तीचा अपरिहार्य परिणाम म्हणून लोकशाही उदयास आली. लोकशाही जणुं एका विशिष्ट प्रकारच्या सामाजिक परिस्थितींतून स्रवूं (secretion) लागली. एकूण लिओनार्ड वूल्फ याच्या मतावरून असें ओघानेंच स्पष्ट होतें कीं, समाजाच्या आचारांच्या व विचारांच्या प्रणालि किंवा जीवनतत्त्वज्ञान ह्यांचा समाजाच्या तत्कालीन आर्थिक व इतर परिस्थितीशीं व रचनेशीं फारच निकटचा संबंध असतो. एवढेंच नव्हे तर, विशिष्ट प्रकारच्या आर्थिक समाजरचनेंतून त्या काळांत तिला अनुरूप असें सामाजिक तत्त्वज्ञान व जीवनप्रणालि नैसर्गिकरीत्या व अपरिहार्यपणें उगम पावत असतात. यावरून सामाजिक घटनांना त्यांचें परिवर्तन होण्यांत व वाढ होण्यांत स्वतःचें असें कांहीं एक तर्कशास्त्र किंवा नियमबद्धता (logic of events) असतें. वस्तुस्थितीला स्वतःचें असें कांहीं एक वेगळें रूप असतें व त्या आपल्या नैसर्गिक स्वरूपाप्रमाणें कार्य करीत असतात. त्या नेहमींच माणसाच्या इच्छांप्रमाणें वळत नाहींत किंवा माणसांचें प्रभुत्व मान्य करीत नाहींत. त्यांच्या ठिकाणीं जणुं एक प्रकारचा हेकेखोरपणा (Obstinacy) असतो असें वूल्फ मानतो. वास्तविक परिस्थितीचें असें हें स्वतःचें वेगळें स्वातंत्र्य व सामर्थ्य दृष्टिआड करून त्यांची उपेक्षा करून चालणार नाहीं. मनुष्य नेहमींच परिस्थितीवर स्वार होण्यांत व तिच्यावर आधिपत्य चालविण्यांत यशस्वी होऊं शकतो असें मानणें वस्तुस्थितीला धरून होणार नाहीं. म्हणजे माणसाला हवें तसें आदर्श जीवन कोणत्याहि परिस्थितींत–म्हणजे प्रतिकूल परिस्थितींतहि यशस्वीपणें जगतां येईल अशी आशा बाळगण्यास कोणता शास्त्रीय आधार आहे ? वूल्फच्या म्हणण्याप्रमाणें सामाजिक परिवर्तनांत नव्या जीवनपद्धतीला अनुकूल व अनुरूप नसणाऱ्याहि सामाजिक व राजकीय संस्थांना चिकटून राहण्याची प्रवृत्ति माणसांत दिसून येते. पण असा प्रसंग आल्यास तीन पर्याय संभवतात– (१) नवीन जीवनपद्धतीला अनुरूप नसलेल्या जुन्या सामाजिक व राजकीय संस्था नाहींशा करणें किंवा त्या आवश्यक त्या रीतीनें बदलणें. (२) जुनी समाजरचना व शासनसंस्थेची रचना चालू राहावी म्हणून नवीन जीवनपद्धतीचा त्याग करणें. (३) हीं दोन्हीं घडूं शकलीं नाहींत तर












समाजावर फार ताण व दाब पडून समाजाचीं शकलें पडणें किंवा युद्ध वा क्रान्तीच्या रूपानें समाजाचा स्फोट होणें.

या सर्व मुद्यांवरून असें दिसतें कीं, जशी वेळोवेळीं मानव आपल्या इच्छा, आकांक्षा व ध्येयांच्या दिशेनें सामाजिक परिस्थितीला वेगवेगळीं वळणें देऊन इच्छित प्रकारचें समाजपरिवर्तन करण्याचा प्रयत्न करीत असतो, व त्यांत जरी त्याला कांहीं वेळां अंशतः येत असतें, तरी ऐतिहासिक घटना संपूर्णपणें मानवाच्या आधीन नसतात. त्यांच्या घडण्यांत जणुं स्वतःचे कांहीं गतिनियम असतात व त्यांना मानवाला डावलतां येत नसतें. याच अर्थानें वूल्फ (Obstinacy of facts) असा शब्दप्रयोग करीत असावा. ह्याचा अर्थ वस्तुस्थिति व समाजांतील आर्थिक व इतर स्थिति व माणसाचे आदर्श यांत सुसंवादीपणाची जुळणी होण्यासाठीं एक प्रकारचें सामंजस्य किंवा आनुकूल्य असावें लागतें. हें आनुकूल्य किंवा अनुरूपता जेथें नसेल तेथें कितीहि चांगले व दोषहीन आदर्श व विचार असले तरी ते प्रत्यक्षांत साकार होण्याची शक्यता फारच थोडी असणार.

### अवास्तव व कल्पनाप्रधान समन्वय

आचार्यांनीं ऐतिहासिक व विश्लेषणात्मक पद्धतीचा अवलंब आपल्या विवेचनांत केलेला नाहीं असें म्हणण्याचा माझा मुळींच हेतु नाहीं. परंतु त्या पद्धतीचें प्रमाण त्यांच्या लिखाणांत कमी असावें असें वाटतें. ऐतिहासिक व विश्लेषणपद्धतीचा त्यांनीं सूक्ष्मपणें व कांटेकोरपणानें उपयोग केला असता तर कदाचित् त्यांचें विवेचन व निष्कर्ष अधिक शास्त्रशुद्ध होऊन ते वेगळ्या प्रकारचे दिसले असते. आचार्यांवर गांधीजींच्या विचारांचा व चारित्र्याचा अधिक प्रभाव पडल्यामुळें त्यांचा ओढा साहजिकपणें आदर्शाकडे अधिक दिसतो व आदर्शांना त्यामुळें त्यांच्या लिखाणांत अधिक प्राधान्य मिळत गेलें; व हें होत असतांना वास्तवापासून ते नकळतपणें दूर जाऊं लागले, व त्यामुळें वास्तवाचा हवा तितका नीट आस्थापूर्वक व पद्धतशीरपणें, विचार होण्यास त्यांना अडचण आली असावी असें वाटून जातें. वास्तवाचा अधिक पद्धतशीरपणें, तपशीलवारपणें व आस्थेनें त्यांना विचार करतां आला असता तर कितीहि आकर्षक वाटत असला तरी अवास्तविक कल्पनाप्रधान व स्वप्नरंजनासारखा वाटणारा त्यांचा समन्वय वेगळ्या रूपानें अवतीर्ण होऊं शकला असता.

आचार्यांच्या समन्वयाच्या प्रक्रियेंत एक प्रकारचा Eclecticism किंवा सारसंग्राहकता वाटते. वेगवेगळ्या संस्कृतींतील, धर्मांतील, राजकीय, सामाजिक व तात्त्विक विचारांतील सदंश घेऊन त्यांना एकत्र जोडून त्या सर्वांचा एक नवविचार निर्माण करीत असतांना तो सुंदर सुंदर रंगांच्या व नक्षींच्या कापडांचे तुकडे सुंदर रीतीनें एकत्र जोडून त्यांचा एखादा सुंदर गालीचा तयार करण्याचा प्रयत्न करण्यासारखा वाटतो. त्या सर्व एकत्र जोडलेल्या भागांचें प्राणमय संयोजन होऊन तो समन्वय जिवंत व रसमय वाटत नाहीं. त्यांत एक प्रकारची कृत्रिमता, बाहेरून लादलेली व यांत्रिकपणानें निर्माण केलेली एकता ( unity ) केल्यासारखें वाटतें. यांत आपोआप व आंतून तयार व व्यक्त झालेली अंगची एकता, अखंडता व एकरसता वाटत नाहीं. हा प्रयत्न जरी फार मोठा असला तरी परिणाम मात्र इच्छेप्रमाणें घडतांना दिसत नाहीं; व ह्याला कारण परस्परांशीं अननुरूप अशा गोष्टी एकत्र येत आहेत हें असावें, असें वाटतें.

आचार्यांचा समन्वयाचा प्रयत्न कांहींसा झाडांचें कलम करून एका प्रकारच्या झाडावर दुसऱ्या प्रकारचीं फुलें व फळें फुलविण्याच्या म्हणजे **कलम करण्याच्या** प्रयत्नासारखा वाटतो. विचारांचें कलम करतां येत नाहीं असें नाहीं. परंतु परस्पराहून अगदीं भिन्न अशा विचारांचें परस्परांशीं कलम करून



अनुक्रमणिका






त्यांतून हवें तसें फळ निर्माण करतां येणें शक्य आहे कां हा एक मोठा प्रश्नच आहे. एका झाडाचें दुसऱ्या झाडावर कलम करून त्यांचा सुसंवादी मेळ बसून त्यांच्या संयोगांतून अपेक्षित फळ मिळणें हें त्यांच्या परस्परांशीं असणाऱ्या अनुरूपतेवर अवलंबून राहणार. आचार्यांच्या विचारांचें कलम करण्याच्या प्रक्रियेंत परस्परांशीं अनुरूप नसणाऱ्या विचारांचा एकरस किंवा सुसंवादी मिलाफ होऊन त्यांतून एका नव्या प्रकारच्या फळाचा जन्म होऊं शकेल अशी श्रद्धा अन्तर्भूत असल्यासारखी दिसते. ती किती प्रमाणांत प्रत्यक्षांत साकार व फलद्रूप होण्याची कितपत शक्यता आहे ह्याचा विचार व्हावयास हवा. आचार्यांना अभिप्रेत व अपेक्षित असा समन्वय कोठें खरा ठरून फलद्रूप झालेला दिसत नाहीं. जातिविरहित व समताधिष्ठित ( casteless and equal ) असा समाज होण्यासाठीं वूल्फनें वर म्हटल्याप्रमाणें एका विशिष्ट प्रकारच्या यंत्रप्रधान आर्थिकरचना पाश्चिमात्य देशांत निर्माण झालेली आहे तशी तयार न करतां खेड्यांतील प्राचीन जात्यधिष्ठित अर्थव्यवस्था व उद्योगव्यवस्था ( म्हणजे कांहीं जातींच्या लोकांनीं पूर्वापार पद्धतीनें चालत आलेले विशिष्ट धंदेच करीत रहावयाचें ) कायम ठेवून त्यांच्यांत समतेची व लोकशाहीची भावना अपेक्षित करणें म्हणजे जुन्या भारतीय अर्थव्यवस्थेच्या झाडाच्या बुंध्यावर नवीन भावनांचें व विचारांचें कलम करून समतेच्या भावनेचें फूल फुलविण्याच्या प्रयत्नासारखें वाटतें. त्यांचा हा समन्वय म्हणजे कांहीं विचारांचें मिश्रण करून त्याला नवें स्वरूप येण्याची वाट पाहात बसण्याच्या प्रयत्नासारखें वाटतें. असा हा समन्वय खरोखरच वास्तविक ठरून तो लोकजीवनाचें जिवंत श्रद्धास्थान व जीवनमार्ग होऊं शकेल काय हा प्रश्न आहे.

आचार्य न्यायबुद्धि सतत जागृत ठेवून ज्यांत जीवनाच्या सर्व अंगांचा जास्तींत जास्त विकास होऊन जीवनपरिपूर्णतेचा साक्षात्कार होऊं शकेल असा समन्वय करण्याचा प्रयत्न करीत होते. भारतीय लोकांचें जीवन अधिक अध्यात्मप्रधान आहे व पाश्चिमात्यांचें जीवन भौतिकताप्रधान आहे असें मानून त्या दोघांचा आपल्या प्रणालींत समन्वय घडविण्याचा प्रयत्न ते करीत होते. परंतु वर दाखविलेला भारतीयांचा व पाश्चिमात्यांचा विरोध मुळांत कितपत खरा आहे हें पूर्णपणें तपासलें पाहिजे, व तो विरोध खरा ठरल्यास मगच त्यांच्यांतील समन्वयाचा प्रश्न संभवूं शकेल. अर्थात् त्याची चर्चा येथें करणें शक्य नाहीं. पण एक गोष्ट मात्र खरी कीं अध्यात्माकडे आचार्यांचा ओढा अधिक असल्यामुळें ते वास्तवाचा हवा तेवढा आस्थेनें विचार करून व वास्तवाचे नियम शोधून काढून त्यांच्या अनुरोधानें समन्वय करूं शकले नाहींत. ऐतिहासिक पद्धतीचा व विश्लेषणाचा अवलंब करून व वास्तवाला अधिक जवळ राहून त्यांनीं समन्वय घडविण्याचा कांटेकोरपणानें प्रयत्न केला असता तर तो प्रत्यक्षांत साकार होण्याची शक्यता वाढली असती. परंतु त्यांचा वास्तवाचा आधार सुटत गेल्यामुळें ते आदर्श व अध्यात्म यांवरच अधिक भर देण्याकडे झुकले, व म्हणून त्यांनीं एवढा खटाटोप करून जो समन्वय तयार केला तो अवास्तविक व स्वप्नरंजनात्मक ठरण्याची शक्यता अधिक वाटते.

### एक महान् प्रयत्न

प्रा. बेडेकरांनीं आपल्या व्याख्यानांत शेवटीं मानवी स्वभावाबद्दल मांडलेला मुद्दा मात्र खरोखरच महत्त्वाचा आहे. त्यांच्यामतें मनुष्य मुळांत शुद्ध, चांगला, न्यायप्रेमी व सत्यप्रेमी असतो, वगैरे वगैरे समजण्यास कोणताच आधार नाहीं. मनुष्यास असें समजण्यानें फारच मोठे प्रमाद इतिहासांत घडलेले दिसतात. उलट मनुष्य कांहीं अंशीं सुष्ट व कांहीं अंशीं दुष्ट आहे, हा सर्वांचा नित्याचा अनुभव आहे. हें एक आनुभव–सत्य ( Empirical truth ) आहे व म्हणून तेंच खरें मानून व मनुष्य आहे तसाच गृहीत धरून त्याला अधिक सुखी, उन्नत व सुसंस्कृत करण्याचे

मार्ग सुचवायला हवेत. माणसाला तो नाहीं तसा समजून त्याचें मूल्यमापन करण्यानें व त्या रीतीनें त्याला उन्नत करण्याचे मार्ग सुचविण्यानें बऱ्याच आपत्ति ओढवतात, व त्यापासून आचार्यहि मुक्त दिसत नाहींत.

कांहींहि असलें तरी आचार्यांचा हा समन्वयात्मक जीवनतत्त्वज्ञान बनविण्याचा प्रयत्न महान् व बहुमोल तर खराच. त्यांनीं त्यासाठीं जन्मभर विचारांची व ज्ञानाची आराधना केली. परंतु त्यांचा हा सामाजिक परिस्थिति व नैसर्गिक घटना, आणि माणसाचे आदर्श यांच्यांत समन्वय कसा, केव्हां व कितपत यशस्वी होऊं शकतो हाच विचार प्रामुख्यानें करावयास हवा; व त्यासाठीं ऐतिहासिक व सामाजिक घटनांना स्वतःचें असें कांहीं गतिशास्त्र व नियम असतात कीं काय, व त्यांचा माणसाच्या इच्छा आकांक्षा व ध्येयें यांच्यांशीं कोणत्याहि परिस्थितींत समन्वय होऊं शकतो का ह्याचा शास्त्रशुद्ध विचार होऊं शकल्यास मला वाटतें, आचार्यांच्या समन्वयाच्या दर्शनाची अधिक स्पष्टपणें छाननी करतां येईल, व त्यांचें हें दर्शन प्रत्यक्षांत साकार होण्यांत व लोकजीवनाचें एक गतिमान तत्त्व बनण्यांत कांहीं उणीवा आहेत कीं काय ह्याचाहि उलगडा होईल. आचार्यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयीं व त्यांच्या या चिंतनप्रधान लिखाणाविषयीं माझ्या मनांत नेहमींच नितांत आदर मी बाळगत आलों आहे. या निमित्तानें माझी शंका मी मांडली आहे. तिच्यावर अधिक शास्त्रशुद्ध चर्चा झाल्यास ती सर्वांनाच उद्बोधक व मार्गदर्शक होऊं शकेल.

---

## वाचकांचा पत्रव्यवहार

श्री. कार्यकारी संपादक, ‘ नवभारत ’ मासिक यांसी—

‘ नवभारत ’ मासिकाचा जानेवारीचा अंक आज माझ्या वाचनांत आला. श्री. म. दा. साठे यांच्या लेखांतील शेवटचा परिच्छेद वाचून मी चकित झालों. अकोला येथें भरलेल्या विदर्भ साहित्यसंमेलनाला मी गेलों नव्हतों तेव्हां वऱ्हाडी भाषेचें वेगळें व्याकरण करण्याचा ठराव मी तेथें मांडला नाहीं, हें वेगळें सांगावयास नको. तशा रीतीचा कोणताच ठराव मी कोणत्याहि संमेलनांत मांडला नाहीं किंवा लिहूनहि पाठविला नाहीं. बस्तरमधील हळबी किंवा सातपुड्यांतील ‘ कोरकु ’ इत्यादि वन्य-भाषा मराठीच्या बोली आहेत काय हें ठरविण्याच्या दृष्टीनें त्यांचा अभ्यास व संशोधन व्हावें असें माझें मत आहे. सर्व महाराष्ट्राची लेखनपद्धति एकच असावी असाच प्रयत्न मी आजपर्यंत करीत आलों आहे. येत्या अंकांत हा खुलासा प्रसिद्ध करावा हे विनंती.

आपला,

शं. दा. पेंडसे

श्री. संपादक, ‘ नवभारत ’ यांस,

“ जानेवारीच्या अंकांतील माझ्या लेखांत शेवटच्या परिच्छेदांत केलेलें डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या विषयींचें विधान गैरसमजानें केलें गेलें आहे. ”

आपला,

म. दा. साठे.








# या ग्रामीण भागांतून आतां

# नवचैतन्य निर्माण झालें आहे

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील

5

समाज विकास आणि
राष्ट्रीय विकास योजना

[illegible]यांचा हेतू केवळ भौतिक विकास साधणें एवढाच नाहीं; तर लोकांचा दृष्टिकोन बदलणें, त्यांच्यामध्ये चांगल्या प्रकारचें जीवन जगण्याची आकांक्षा निर्माण करणें आणि हें साध्य करण्यासाठीं कार्यरत होण्याची दुर्दम्य इच्छाशक्ति त्यांच्यामध्यें निर्माण करणें हाहि त्याच्यामागील हेतु आहे. १ मे १९५६ पर्यंत मुंबई राज्यांत समाज विकास व राष्ट्रीय विकास योजनांचे मिळून एकुण ११० गट सुरू करण्यात आले आहेत. त्यानी व्यापलेलें क्षेत्र २७०८४ चौरस मैल असून ७२१२७८० लोकसंख्या असलेली ८८९४ खेडी त्यांत समाविष्ट झालेली आहेत.

**अभिमान वाटावा असें सहकार्य**

मुंबई सरकारच्या प्रसिद्धि खात्यातर्फे प्रकाशित







# पोलादी सामर्थ्य

पोलाद म्हणजे राष्ट्राची शक्ति: लहानमोठ्या उद्योगधंद्यासाठीं, कारखान्यासाठी नित्योपयोगी यंत्रे तयार करण्यासाठीं जास्तीत जास्त पोलादाची गरज आहे.

आणि भिलाई, रूरकेला व दुर्गापूर येथें चालू करण्यांत आलेले पोलादाचे कारखानें ही गरज खचित भागवितील.



## शक्तीचा आधार

कारखान्यांत लागणाऱ्या कच्च्या मालाची व तेथें तयार होणाऱ्या मालाची ने-आण करण्यासाठीं वाहातुकीचीं साधनें वाढविण्यांत येत आहेत.

पोलाद, कोळसा, आगगाड्या, बंदरे व तदनुषंगिक गोष्टी म्हणजें आर्थिक विकासाचा गाभाच होय. आणि सहाजिकच आहे कीं द्वितीय पंचवार्षिक योजनेंत या गोष्टीना सर्वांत जास्त महत्व देण्यांत आले आहे.

**योजनेसह पुढें चला.**

**प्रगतीसाठीं, उत्कर्षासाठीं.**

DA 57/296 MAR.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका